

# बालभारती



## मराठी, पुस्तक तिसरे

9/c 1979-80

शिक्षणखात्याचा मंजुरी - क्रमांक : पपम १०० (भाषा) (३) ह, दि. २८-४-१९६९

# बालभारती

## मराठी, पुस्तक तिसरे

अधिप्रमाणित प्रत

विदया सचिव,
मराठी व संकीर्ण विषय




~~१९७९~~ ८०

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे

प्रथमावृत्ती : १९६९

पुनर्मुद्रण : १९७९ ८०/
अकरावे/ ~~दहावे~~

कागद :
६१ × ८६ सेमी.
६० ग्रॅम चौमी.
व्हाइट प्रिंटिंग पेपर



"ह्या पुस्तकाचा कागद महाराष्ट्र राज्य शिक्षण खात्याने सवलतीच्या दरात उपलब्ध करून दिला आहे"

मुद्रक :
चंदन दास
न्यू जॅक प्रिंटिंग
वर्क्स प्रा. लि.
मुंबई - ४०० ०१३

मुद्रणादेश :
पीओ – टीबी/६८३/७९
(३.००)

प्रकाशक :
वा. गो. थोरात
नियंत्रक,
पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ,
मुंबई ४०००१८

## प्रस्तावना

शासनमान्य अभ्यासक्रमानुसार पाठ्यपुस्तकांची निर्मिती व्हावी या उद्देशाने महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळाची स्थापना झालेली आहे. मंडळाने इयत्ता १ ते ७ पर्यंतच्या विविध विषयांच्या पाठ्यपुस्तकांच्या निर्मितीचा कार्यक्रम आखलेला असून सदर पाठ्यपुस्तक त्यानुसार तयार केले आहे. ते तयार करताना शिक्षक, शिक्षणशास्त्रज्ञ आणि विविध शिक्षणसंस्था यांनी पाठवलेल्या सूचनांचा काळजीपूर्वक विचार करण्यात आला असून ते अधिकाधिक निर्दोष कसे करता येईल याकडे लक्ष पुरवण्यात आले आहे.

भारत सरकारने मान्य केलेल्या व महाराष्ट्र शासनाने स्वीकारलेल्या देवनागरी लिपीतील सुधारणा व जोडाक्षर-पद्धती यांचा या पुस्तकाच्या मुद्रणात अवलंब केला आहे.

(स्वाक्षरी)

पुणे : ४११००४
२८ एप्रिल १९६९
वैशाख ८, १८९१

संचालक,
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती
व अभ्यासक्रम संशोधन मंडळ

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे. सारे भारतीय माझे बांधव आहेत.

माझ्या देशावर माझे प्रेम आहे. माझ्या देशातल्या समृद्ध आणि विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे. त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.

मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.

माझा देश आणि माझे देशबांधव यांच्याशी निष्ठा राखण्याची मी प्रतिज्ञा करीत आहे. त्यांचे कल्याण आणि त्यांची समृद्धी ह्यांतच माझे सौख्य सामावले आहे.

# अनुक्रमणिका



# १. देवाचे घर

इवल्या इवल्याशा
टिकल्या टिकल्यांचे
देवाचे घर बाई उंचावरी
ऐक, मजा तर ऐक खरी !

निळी निळी वाट
निळे निळे घाट
निळ्या निळ्या पाण्याचे झुळझुळ पाट
निळ्या निळ्या डोंगरात निळी निळी दरी
ऐक, मजा तर ऐक खरी !

चांदीच्या झाडांना सोन्याची पाने
सोनेरी मैनेचे सोनेरी गाणे
सोन्याची केळी, सोन्याचा पेरू,
सोनेरी आंब्याला सोनेरी कैरी
ऐक, मजा तर ऐक खरी !

देवाच्या घरात गुलाबाची लादी
मऊ मऊ ढगांची अंथरली गादी
चांदण्याची हंडी
चांदोबाची भांडी
चांदोबाचा दिवा मोठा लावला वरी
ऐक,मजा तर ऐक खरी !



❖ ❖ ❖

## अभ्यास :

१. या कवितेत सांगितल्याप्रमाणे देवाचे घर कोणते ? ते कोठे आहे ?
२. त्या घराचे वर्णन करताना कोणकोणत्या मजेदार गोष्टी सांगितल्यां आहेत ?
३. 'मऊ मऊ' म्हणजे फार मऊ. अशा प्रकारे या कवितेत वापरलेले शब्द शोधा व त्यांचे अर्थ लावा.



## २. मायेची पाखर

कर्मवीर भाऊराव पाटील यांच्याबद्दल मला अत्यंत आदर. एकदा मी पुण्याला जाताना वाटेत सातारला थांबलो. भाऊरावांना भेटावे म्हणून त्यांच्याकडे गेलो. भाऊरावांना भेटलो. त्यांची भेट झाली; मला खूप समाधान वाटले. सर्व जण भाऊरावांना 'अण्णा' म्हणत असत. अण्णांनी मला संस्था दाखवण्यासाठी नेले. संस्था पाहून झाली. अंधार पडला. रात्र झाली.

"सर्व काही झालं. आता इथंच मुक्काम करा !" अण्णांनी मला आग्रह केला. अण्णांचा आग्रह तो ! नाही कसे म्हणायचे ? राहिलो झाले तेथे.

त्या संस्थेच्या आवारात एक मोठे वडाचे झाड होते. आजूबाजूलाही गर्द झाडी होती. त्यात थंडीचे दिवस होते. कडक थंडी पडली होती.

पत्र्याच्या खोल्यांतून मुले राहात होती. अशाच पत्र्यांनी बनवलेल्या एका खोलीत अण्णा आडवे झाले. मीही त्यांच्याजवळ बसलो. त्यांनी मला जेवणाचा आग्रह केला.

"नुकतंच जेवण झालंय माझं," असे मी त्यांना सांगितले. अर्थात हे सर्व खोटेच होते. मला वाटले, वसतिगृहाच्या मुलांनी केलेले जेवण ते कसले असणार! म्हणून मी खरे म्हणजे जेवायची टाळाटाळ केली.

मुलांची जेवणे झाली. प्रार्थना झाली आणि ती सर्व झोपी गेली. माझ्या पोटात मात्र कावळे ओरडत होते. मग मला झोप कशी येणार? मी तसाच पडून राहिलो.

अण्णांनी हे ताडले. त्यांनी एका मुलाला हाक मारली, "जा रे, सैपाक-घरात काही शिल्लक असेल ते घेऊन ये बघू!" अशी आज्ञा केली. मुलगा धावतच सैपाकघरात गेला. पिठले, भाकरी, कांदा, तेल एका ताटात घेऊन आला. मी अधाशासारखा त्यावर तुटून पडलो. पंचपक्वान्नांपेक्षाही ते मला रुचकर लागले. मग काय, बिछान्यावर पडल्या पडल्याच डोळा लागला.

मध्यरात्र उलटून गेली. कशाची तरी चाहूल लागून मला जाग आली. दोनचा सुमार असावा. अण्णा उठले होते. त्यांनी कंदील हातात घेतला. प्रत्येक मुलाला झोप लागली की नाही, त्याच्या अंगावर पांघरूण आहे की नाही, हे ते पाहू लागले. त्यांनी पाहिले की, एक धनगराचा मुलगा थंडीने कुडकुडत आहे. अण्णा त्याच्याजवळ गेले. त्यांनी त्याला आपल्या दोन्ही हातांनी अलगद उचलले. स्वतःच्या बिछान्यावर झोपवले. स्वतःची कांबळ त्याच्यावर घातली. त्याला अगदी आपल्या पोटाशी धरले. त्या उबेत तो मुलगा गाढ झोपी गेला.

त्या मुलांपैकी कितीतरी जणांना आई नव्हती. कितीतरी जणांना वडील नव्हते. कित्येक दुर्दैवी मुलांना या जगात कोणी कोणी नव्हते. पण अण्णांनी त्यांच्यावर पित्याच्या प्रेमाचा आणि मातेच्या मायेचा वर्षाव केला होता. मायेची पाखर त्यांना मिळाली होती.

मी हे सगळे उघड्या डोळ्यांनी पाहिले. सकाळी मी उठलो. अण्णांना कडकडून भेटलो. नकळतच माझ्या मुखातून शब्द बाहेर पडले, "अण्णा, आपण खरेखुरे या मुलांचे आईबाप आहात. या मुलांचेच नव्हे, तर या महाराष्ट्रातील गोरगरिबांच्या मुलांचे आपण पालक आहात. देव आपणांस उदंड आयुष्य देवो!"



✤ ✤ ✤

**अभ्यास :**

१. पाहुण्यांनी अगोदर जेवायचे का नाकारले? नंतर त्यांनी जेवण का घेतले? त्यांना ते जेवण रुचकर का वाटले? २. वसतिगृहातील मुलांवर अण्णांची माया कोणाप्रमाणे होती? कोणत्या प्रसंगावरून हे दिसून येते? ३. पाहुणे भाऊरावांना सकाळी उठल्यावर काय म्हणाले? ४. योग्य जोड्या लावा :

| अ | आ |
|---|---|
| (१) टाळाटाळ करणे | (१) फार भूक लागणे |
| (२) पोटात कावळे ओरडणे | (२) झोप लागणे |
| (३) डोळा लागणे | (३) खूप माया करणे |
| (४) मायेचा वर्षाव करणे. | (४) स्पष्टपणे नाही न म्हणणे. |



# ३. चतुर शेतकरी

एक होता शेतकरी. तो होता मोठा चतुर. त्याच्या शेतात चांगले पीक येत नसे. तेव्हा त्याला मोठी काळजी पडली की आता काय करावे! मग त्याने देवाची केली प्रार्थना. देव झाला प्रसन्न.

शेतकरी म्हणाला, "देवा, माझ्या शेतात चांगलं पीक येऊ दे. त्यातलं निम्मं पीक मी तुला देईन."

देव म्हणाला, "ठीक आहे."

मग शेतकऱ्याने विचारले, "देवा, तुला पिकाचा खालचा भाग पाहिजे की वरचा?"

शेतकरी मोठा चतुर होता, हे देवाला माहीत होते. त्याला त्याच्या चातुर्याची परीक्षा पाहायची होती. तो म्हणाला, "वरचा."

शेतकऱ्याने काढले भुईमुगाचे पीक. खूप पीक आले. ठरल्याप्रमाणे शेतकऱ्याने घेतल्या भुईमुगाच्या शेंगा व देवाला दिला वरचा वरचा पाला.

देव हसला; मनात म्हणाला, "बरं! असा फसवतोस काय?"



पुढच्या वर्षी शेतकऱ्याने देवाला पुन्हा तोच प्रश्न विचारला. या वेळी देव म्हणाला, "आता मात्र पिकाचा खालचा भाग मी घेणार."

शेतकऱ्याने केली युक्ती. या वेळी लावला जोंधळा. खूप पीक आले. आपण घेतली वरची वरची कणसं आणि देवाला दिली ताटं. देव हसला. मनात म्हणाला, "अरे, यंदाही फसवलंस काय? मोठा चतुर दिसतोस!"

मग तिसऱ्या साली जेव्हा शेतकऱ्याने पुन्हा विचारले, तेव्हा देव म्हणाला, "या वेळी मला पिकांचे दोन्ही भाग पाहिजेत; खालचा निम्मा आणि वरचा निम्मा."



मग खूप विचार करून शेतकऱ्याने त्या साली पेरला मका. खूप पीक आले. ठरल्याप्रमाणे देवाला दिले वरचे तुरे आणि खालचे बुडखे.. आपण मात्र घेतली मधली कणसे. देवाला शेतकऱ्याच्या चातुर्याचे कौतुक वाटले. त्याने पुन्हा त्याची परीक्षा घ्यायची असे ठरवले.



त्याने पावसाला आज्ञा केली, "मेघराजा, तू या वर्षी फक्त डोंगरावरच पड. मग पाहू या शेतकरी कसा पीक घेतो ते."

शेतकऱ्याने पाळला होता एक पोपट. त्या पोपटाने देवाचे व पावसाचे बोलणे ऐकले. त्याने ते शेतकऱ्यास सांगितले. मग शेतकऱ्याने केली एक युक्ती. त्या वर्षी डोंगरावरच त्याने पीक घेतले. डोंगरावर लावले भात. देवाने सांगितल्याप्रमाणे सगळा पाऊस डोंगरावरच पडला. मग काय? भाताचे पीक भरघोस आले. भातच भात झाले. ते पाहून देवाला शेतकऱ्याचे फार कौतुक वाटले. देव प्रसन्न झाला. त्याने शेतकऱ्याची पाठ थोपटली.

❖ ❖ ❖

## अभ्यास :

१. शेतकऱ्याची कोणती युक्ती तुम्हांला विशेष आवडली? का?
२. पोपटाने शेतकऱ्याला काय सांगितले?
३. देवाने शेतकऱ्याची पाठ का थोपटली?
४. बुडखा, ताटे या शब्दांचे अर्थ समजावून घ्या.
५. शेतकरी व देव यांच्यामध्ये झालेला संवाद गुरुजींच्या मदतीने वर्गात करून दाखवा.



## ४. फुलपाखरे

धरू नका ही बरे । फुलांवर उडती फुलपाखरे !

काल पाकळ्या रात्री निजल्या
सकाळ होता सगळ्या उठल्या
आणि त्याच का उडू लागल्या
पंख फुटुन गोजिरें । फुलांवर उडती फुलपाखरे !

मजेमजेचे रंग तयांचे
संध्याकाळी जसे ढगांचे
ऊन कोवळे त्यावर नाचे
सकाळचे हासरे । फुलांवर उडती फुलपाखरे !

फुलाफुलांशी हासत खेळत
फिरती भवती पिंगा घालित
बघा दुरूनच त्यांची गंमत
दृश्य मनोहर खरे । फुलांवर उडती फुलपाखरे !

हात लावता पंख फाटतिल
दोरा बांधुन पायहि तुटतिल
घरी कशी मग सांगा जातिल ?
दूर तयांची घरे । फुलांवर उडती फुलपाखरे !



✤ ✤ ✤

**अभ्यास :**

१. कवीला फुलपाखरे कोणासारखी वाटतात? का?

२. फुलपाखरे काय काय करीत आहेत?

३. फुलपाखरांसंबंधी कोणती काळजी घेण्यास कवीने सांगितले आहे?

४. योग्य शब्द भरा :

(अ) फुलपाखरे म्हणजे उमलून उडू लागलेल्या ········.

(आ) फुलपाखरांचे ········ सायंकाळच्या ढगांच्या ········ सारखे दिसतात.



# ५. शेजारधर्म

राणोजी खोत आपल्या ओसरीवर बसले होते. त्यांच्या शेजारी त्यांचा मुलगा पुढ्यात पुस्तके पसरून बसला होता. त्याचे अभ्यासात लक्ष लागत नव्हते. त्याचे सारे लक्ष गलोल तयार करण्यातच होते. हातात रबराच्या पातळ पट्ट्या घेऊन तो गलोल तयार करीत होता. तेवढ्यात शेजारचे हरिबाबा पवार काठी टेकत आले. त्यांची चाहूल लागताच राणोजी खोत म्हणाले, "या मालक, कसं येणं केलं?"

हरिबाबांनी सुस्कारा सोडला आणि काठीचा आधार घेत बैठक मारली. राणोजींनी पुन्हा विचारले, "कसं काय येणं केलं?"

हरिबाबा म्हणाले, "तुमच्या रामूला घडीभर आमच्याकडं पाठवून द्या. थोडं काम आहे."

"पाठवून देतो. काही काळजी करू नका," असे राणोजी त्यांना म्हणाले. पण मध्येच राम कुरकुरत म्हणाला, "बाबा, आज मला शाळेचा फार अभ्यास आहे. आज नाही मला जायला जमणार." यावर राणोजींनी आपल्या मुलाला मध्येच अडवून म्हटले, "अरे, अभ्यास करच; पण आज थोडं कमी खेळ."

राम वडिलांच्या धाकात होता. तो काही बोलला नाही. थोड्या वेळाने हरिबाबा निघून गेले. ते गेल्यावर राणोजी रामला म्हणाले, "राम, अरे, आपल्या शेजाऱ्यांनी काही काम सांगितलं तर लगेच असं नाही म्हणू नये. शेजारधर्माला जागून तू त्यांच्याकडे जायला पाहिजे. समज, तू गेला नाहीस तर त्यांचं काम अडणार आहे का? नाही अडायचं. दुसरा कोणीतरी येऊन त्यांना मदत करीलच. पण मग तुझ्याबद्दल त्यांना काय वाटेल?"

राम थोडा वरमला. काय बोलावे हे त्याला सुचेना. तरी पण तक्रारीच्या सुरात तो म्हणाला, "पण बाबा, गोडगोड बोलून हरिबाबा नेहमीच माझ्याकडून काम करून घेतात."

"मग त्यात काय बिघडलं? अरे, माणसानं कष्ट करायला कंटाळू नये. कष्ट करण्यानं माणसाच्या अंगातील ताकद वाढते. शिवाय लोकांचा भलेपणा मिळतोच; हा फायदा फार मोठा आहे. तो जन्मभर तुला पुरणार आहे." असे म्हणून राणोजी आपल्या मुलाला पुढे म्हणाले, "समज, उद्या आपल्याला कोणाची गरज लागली आणि आपल्याला शेजाऱ्यांनी तुझ्या-सारखं उत्तर दिलं, तर आपल्याला काय वाटेल?"

रामने काही उत्तर दिले नाही. तो गप्प बसला. मग राणोजी त्याला

म्हणाले, “तू तसा समजूतदार मुलगा आहेस, म्हणून तुला सांगतो, ऐक.” असे म्हणून त्यांनी आपल्या हाताचा पंजा त्याच्यासमोर धरला आणि विचारले, “माझ्या हाताला किती बोटं आहेत?”

राम म्हणाला, “पाच.”

“ही पाची बोटं सारखी आहेत का?”

“नाही. लहान-मोठी आहेत.”

यावर राणोजी हसले आणि म्हणाले, “अरे, ही आपल्या हाताची पाची बोटं सारखी नाहीत; पण ही पाची बोटं मिळूनच हाताचा पंजा झाला आहे की नाही? तसं पाहिलं तर प्रत्येक बोट आपल्या परीनं स्वतंत्र आहे. तरी एका बोटाला लागलं की शेजारच्या बोटाला दुःख होतंच. त्यांच्यातील सुखदुःखाची जाणीव एकच आहे. कोणतीही कामं करताना ती एकोप्यानं करतात. ही बोटं म्हणजे एकमेकांचे शेजारीच. शेजाऱ्यांनी परस्परांच्या उपयोगी पडावं.”

रामला आपल्या वडिलांचे सांगणे एकदम पटले. तो हसला. आपल्या हाताच्या पंजाकडे त्याने पाहिले. पंजाची हालचाल केली. मूठ दाबली आणि उघडली व तो आपल्या वडिलांच्याकडे बघून म्हणाला, “बाबा, तुम्ही म्हणता ते खरं आहे. मी जातो हरिबाबांकडे. त्यांचं काय काम असेल ते करतो.”

रामच्या वडिलांना त्याच्या या उत्तराने मोठा आनंद वाटला.

* * *

**अभ्यास :**

१. हरिबाबांकडे जायला राम का तयार नव्हता?

२. रामने हरिबाबांचे काम करावे, असे राणोजींना का वाटले?

३. बोटांच्या उदाहरणावरून राणोजींनी शेजारधर्माच्या कोणत्या गोष्टी सांगितल्या?

४. तुमच्या वर्गातील मित्राविषयी पाच ओळी लिहा.

# ६. देवाला सारी प्रिय

संध्याकाळचे चार-पाच वाजण्याची वेळ होती. श्यामची आई देवळात गेली होती. श्याम घरीच होता. देवदर्शन करून आई आली तेव्हा श्यामने विचारले, "आई, मी जाऊ का बाहेर ?"

आई म्हणाली, "श्याम ! तू जा. परंतु तुला एक काम सांगते, ते आधी कर. रस्त्यात एक महारीण बसली आहे. म्हातारी आहे अगदी. तिच्या डोक्यावरची लाकडाची मोळी खाली पडली आहे. ती महारीण आजारी व अशक्त दिसते आहे. तिच्या डोक्यावर मोळी दे व घरी ये."

श्यामने विचारले, "आई, लोकांनी बघितलं तर ते मला हसतील; मला मारायला येतील. खरंच का मी जाऊ ?"



"लोकांना सांग की, ती म्हातारी इथं किती वेळ कोणी महार येतो का म्हणून वाट पाहत बसणार? मोळी विकून तिला परत महारवाड्यात जायचं आहे." श्यामची आई म्हणाली.

आईचे म्हणणे ऐकायचे एवढे श्यामला ठाऊक. तो गेला. त्याने त्या म्हातारीला विचारले, "का ग, डोक्यावर का द्यायला हवी आहे मोळी? मी देतो." असे म्हणून श्याम एकीकडून मोळी उचलू लागला.

"नको रे दादा! तुम्ही बामण. कोणी पाहिलं तर मारतील मला." ती गयावया करून विनवू लागली. पण श्यामने तिच्या डोक्यावर मोळी चढवली.

"अरे श्याम, ती महारीण ना! अरे, तिला शिवलास काय?" श्रीधरभट कोठूनसे अकस्मात उगवले व श्यामला बोलू लागले. त्यांचा शब्द ऐकून शेजारच्या घरात ओसरीवर बसलेले दुसरेही लोक बाहेर आले व श्यामला बोलू लागले.

श्याम त्यांना म्हणाला, "ती म्हातारी किती वेळ थांबेल? काळोख होईल तिला जायला. नदीतून जायचं आहे तिला."

श्याम घरी आला. त्याची आई म्हणाली, "त्या म्हातारीला आपल्याकडंच हाक मार. कुठं लांब जाईल मोळी घेऊन? आपल्याकडची लाकडंही सरली आहेत."

"ए मोळीवाली, इकडं ये." श्यामने तिला हाक मारली. ती आली. श्यामच्या आईने तिला विचारले, "म्हातारे, आजारी का ग आहेस?"

"व्हय माय. ताप लई येतो. काय करताव, पोटाला हवं ना?" असे ती म्हणाली.

श्यामने कणगीतून भात काढून आणले व तिच्या पदरात घातले. त्याच्या आईने दुपारचा उरलेला भात पत्रावळीवर आणला. अंगणाच्या कडेला बसून त्या म्हातारीने तो खाल्ला. पाणी पिऊन दुवा देत ती निघून गेली.



श्यामची आई म्हणाली, "श्याम, महार असो वा मांग असो, सर्वांना मदत करावी. देवाला सारी प्रिय आहेत. कारण सारी त्याचीच लेकरे आहेत. तू माझा म्हणून मला आवडतोस. तशी आपण सारी देवाची म्हणून सारी त्याला आवडतात. मला आवडेल ते तू करतोस, त्याप्रमाणं देवाला आवडेल ते करण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे."

❖ ❖ ❖

**अभ्यास :**

१. आईने श्यामला कोणते काम सांगितले ?

२. श्यामला म्हातारी काय म्हणाली ?

३. देवाला आवडेल अशी कोणती गोष्ट श्यामच्या आईने केली ?

४. ही म्हातारी जर तुम्हांला भेटली तर ही घडलेली हकीकत ती तुम्हांला कशी सांगेल ?

# ७. चांगले तेवढे घ्यावे

पणती – उदबत्ती ग उदबत्ती !
उदबत्ती – कोण ग तू ?
पणती – अग, मी पणती !
उदबत्ती – का ग हाक मारलीस ?
पणती – नाही, म्हटलं घाईघाईनं कुठं चाललीस ?
उदबत्ती – दुसरीकडं कुठं ? देवाच्या देवळाकडं.
पण जाते बाई आता;
उशीर होईल बोलता बोलता.
ओरडतील सगळी,
'उदबत्ती कुठं गेली ?
आरती इथं खोळंबली.'
पणती – काय बाई तरी,
इतकी ऐट नाही हो बरी !
कुणी बोलावलं,
जरासं थांबलीस,
थोडंसं बोललीस,
तर काय बिघडलं ?
उदबत्ती – तेवढंच तुला बोलायला फावलं !
मी कसली ऐटीत, तूच खरी चैनीत !
भिंतीच्या कोनाड्यात आरामात बसावं.
थंडगार तेलानं रोज रोज न्हावं.
कुठं जायला नको, कुठं यायला नको.
आमचं कुठं आहे तसं ?



सर्वांनी टोचायचं,
सर्वांनी बोलायचं,
आपलं दुःख आपणच गिळायचं!



पणती – अगबाई! रडतेस काय अशी?
मन मोकळं करून बोलावं मैत्रिणीशी.
अग गमतीनं बोलले थोडं,
लावून काय घेतलंस एवढं?
उदबत्ती – काय सांगू पणती,
सोसायचं तरी किती?
कुणीही उचलावं,
कुणीही टोचावं.
नको बाई असलं लाजिरवाणं जिणं.
पोरांच्या, थोरांच्या हातातलं खेळणं!
पणती – उगी, उगी, उगी.
आधी कर पाहू रडणं बंद.
वासानं करतेस जगाला धुंद.
सर्वांची लाडकी, म्हणून तुला बोलतात सारखी.
उदबत्ती – अगबाई पणती, हे बघ कोण!
झगमग, लखलख काय दिसतं तिकडं?
पणती – अग, ही तर आपली मेणबत्ती!
एकामागं एक बहिणींची पलटण.
आज खरा सजणार दिवाळीचा सण.
अग अग मेणबत्ती, थांब तरी जरा.
मेणबत्ती – नाही ग बाई, नाही.
आज आहे दिवाळीचा सण,
फुरसत नाही एक क्षण.

शेटजींच्या घरी लक्ष्मीपूजनाचा थाट!
आमच्याविचून कसा व्हायचा झगमगाट?
जाते बाई लवकर.

उदबत्ती – पण हे ग काय असलं?
नाक मुरडायला काय ग झालं?

मेणबत्ती – एवढा मोठा दिवाळीचा सण!
अन् हे काय ग तुमचं भिकारडं लक्षण.
एकीचं लुगडं जशी काही विटकर,
दुसरीचं लुगडं काळं ठिक्कर!
अगदीच कशा तुम्ही साऱ्या जणी वेड्या?
नाही तर बघ आम्हां बहिणींच्या साड्या!
एकीची हिरवी, एकीची निळी,
एकीची लाल, तर एकीची पिवळी!

पणती – मेणबत्ती ग मेणबत्ती,
रागावू नकोस बरं;
पण खरं सांगू का तुला?

मेणबत्ती – काय सांगायचं ग मला?

पणती – असला थाटमाट तुलाच शोभणार!
बाहेरची आरास तुझ्यानं खुलणार!
पण उदबत्तीचं कुठं आहे असं.

मेणबत्ती – सांग बाई कसं?

पणती – कोण बघतं तिच्या रंगरूपाकडं?
सुगंधानं तिच्या होतात सारे जण वेडे.
नको रंगरूप, नको नटायची हाव.
सुवासाबरोबर पसरे जगभर नाव.
देवाची आरती, जेवणाची पंगत,
उदबत्तीवाचून त्याला नाही रंगत.



ठेवू नये नावं;
चांगलं तेवढं घ्यावं.

उदबत्ती – खरंच ग बाई पणती,
वेडी तरी मी किती !
रूप नाही म्हणून आता नाही रडणार.
बाहेरच्या भपक्याला आता नाही भुलणार.
वासाचा घमघमाट तोच माझा थाट !
होईल माझी राख; पण मिरवीन दिमाख !

मेणबत्ती – पणती ग पणती,
चुकलंच माझं,
खरं आहे तुझं.
ठेवू नये नावं, चांगलं तेवढं घ्यावं.
सेवेचा गुण आपण घ्यावा;
गुणांचा लाभ सर्वांना द्यावा.

✤ ✤ ✤

**अभ्यास :**

१. उदबत्तीने आपली कोणती दुःखे पणतीला सांगितली ?

२. पणती व उदबत्ती यांच्याकडे पाहून मेणबत्तीने नाक का मुरडले ? त्यांना ती काय म्हणाली ?

३. उदबत्ती, पणती व मेणबत्ती यांचे कोणते चांगले गुण या पाठात वर्णन केले आहेत ?

४. 'देवाची आरती, जेवणाची पंगत, उदबत्तीवाचून त्याला नाही रंगत.' यासारख्या या पाठातील तुम्हांला आवडणाऱ्या ओळी शोधून काढा.

## ८. सायंकाळची शोभा

पिवळे तांबुस ऊन कोवळे पसरे चौफेर
ओढा नेई सोने वाटे वाहुनिया दूर.
झाडांनी किति मुकुट घातले डोकिस सोनेरी
कुरणावर, शेतात पसरला गुलाल चौफेरी!
हिरवे हिरवेगार शेत हे सुंदर साळींचे
झोके घेते कसे, चहुकडे हिरवे गालीचे!
सोनेरी, मखमली, रुपेरी पंख कितीकांचे
रंग किती वर तऱ्हेतऱ्हेचे इंद्रधनुष्याचे!
अशी अचल फुलपाखरे फुले साळिस जणु फुलती
साळीवर झोपली जणू का पाळण्यात झुलती!
झुळकन् सुळकन् इकडुन तिकडे किति दुसरी उडती!
हिरे, माणके, पाचू फुडुनी पंखचि गरगरती!
पहा पाखरे चरोनि होती झाडावर गोळा.
कुठे बुडाला पलीकडिल तो 'सोन्याचा गोळा'?

✤ ✤ ✤

**अभ्यास :**

१. सायंकाळी झाडे कशी दिसतात? का? २. साळीचे शेत झोके घेत आहे, असे का म्हटले? ३. फुलपाखरांचे रंग कसे होते? ४. पाखरे कोठे गोळा झाली होती? ५. सोन्याचा गोळा कोणास म्हटले आहे? का?



# १. बालशिकारी

आपल्या देशातील ही कथा आहे. आसामजवळच्या नागभूमीत घडलेली. एका छोट्या मुलाची. त्याचे नाव आहे वंगथम पांचा.

वंगथम पांचाचे गाव सोनारी. एक लहानसे खेडे. भोवताली दाट जंगल. किर्र्र झाडीने वेढलेले. अशा जंगलात वंगथम एकटाच फिरे. त्याला भीती कशी ती ठाऊकच नव्हती! तो खांद्यावर बंदूक टाकी आणि जंगलात फिरायला निघे. जंगलातून फिरत राहायचे, हाच त्याचा छंद! डोंगरदऱ्या पायांखाली तुडवताना तो तहानभूक विसरत असे. तसा तो वयानेही फारसा मोठा नव्हता. त्याचे वय होते केवळ चौदा वर्षांचे.

एके दिवशी तो असाच फिरत होता. किर्र्र झाडीतून वाट काढत मजेने चालला होता. संध्याकाळ होत आली होती. त्या घनदाट जंगलात अंधार दाटू लागला होता. वंगथम जंगलाच्या बाहेर पडला. तोच अचानक समोर एक वाघीण दत्त म्हणून उभी! बापरे! केवढे मोठे ते जनावर! केवढा अक्राळविक्राळ व भेसूर जबडा! फुललेल्या कोळशासारखे लाल-भडक डोळे! नुसते लांबून पाहूनच अंगाला दरदरून घाम फुटावा! पण

वंगथम मात्र घाबरला नाही. सावध होऊन तो पवित्र्यात उभा राहिला. बंदूक सज्ज होतीच. वाघिणीची व वंगथमची नजरानजर झाली मात्र—

वाघिणीने त्याच्यावर एकदम झेप घेतली ! वंगथम सावध होताच. विजेच्या चपळाईने त्याने वाघिणीची झेप चुकवली. वाघीण चवताळली. तिने गगनभेदी डरकाळी फोडली. सारे जंगल दणाणून गेले.

इतक्यात...

वंगथमने अचूक नेम धरला, आणि...

'ठो ! ठो ! ठो !' लागोपाठ दोन-तीन गोळ्या झाडल्या. कानाचे पडदे फाडून टाकणारा आवाज निघाला. सूं सूं करीत निघालेल्या गोळ्या वाघिणीच्या वर्मी बसल्या. भेसूर किंकाळी फोडीत वाघीण क्षणार्धात जमिनीवर कोसळली. तिच्या त्या करुण किंकाळीने सारे जंगल दणाणून गेले. जंगलातील पशूंचा भीतीने थरकाप उडाला. ते सैरावैरा धावू लागले. झाडावरचे असंख्य पक्षी फड् फड् असा पंखांचा आवाज करीत आकाशात उडू लागले.

वंगथमने वाघिणीकडे पाहिले. ती निपचित पडलेली त्याला दिसली. तो तिच्याजवळ गेला. हातातली बंदूक अभिमानाने त्याने खांद्यावर धरली. एक पाय वाघिणीच्या अंगावर रोवून तो मोठ्या ऐटीत उभा राहिला.



वाघिणीच्या शिकारीची बातमी गावात पसरली. सारे सोनारी खेडे त्या जंगलाकडे धावले. त्या मेलेल्या वाघिणीच्या भोवती खूप गर्दी जमली ! 'अबब ! केवढे मोठे धूड ! वाव दीड वाव लांब !' जो तो आश्चर्याने तोंडात बोटे घालू लागला.

गावकऱ्यांनी मग वाजतगाजत ती वाघीण गावात आणली. त्यांना हायसे वाटले ! गेले काही दिवस या वाघिणीने त्यांना सळो की पळो करून सोडले होते. सात-आठ माणसांचे बळी तिने घेतले होते. गावकऱ्यांनी तिला मारण्याचा पूर्वी अनेक वेळा प्रयत्न केला होता; पण व्यर्थ ! आज मात्र वंगथमला ती चकवू शकली नाही. बालशिकारी वंगथमने तिच्यावर मात केली ! जे साऱ्या गावाला करता आले नाही, ते या छोट्या वंगथमने करून दाखवले. केवढा पराक्रम ! केवढे हे शौर्य !

शूर वंगथमचे गावकऱ्यांनी अभिनंदन केले. त्याचा गौरव केला. 'शाब्बास वंगथम ! शाब्बास !' असे सर्व गावकरी म्हणाले. वंगथमच्या शौर्याची ही कथा दिल्लीसही पोहोचली. ती भारताच्या पंतप्रधानांच्या कानांवर गेली. त्यांनी वंगथमला दिल्लीला बोलावले. त्याची पाठ थोपटली. त्याच्या या शौर्याबद्दल त्याला राष्ट्रीय पारितोषिक देऊन त्याचा गौरव केला.

* * *

## अभ्यास :

१. वंगथमने केलेल्या शिकारीचे वर्णन करा.

२. बंदुकीचा आवाज होताच जंगलात काय घडले ?

३. 'सूं सूं' यासारखे आवाजाचे वर्णन करणारे या पाठातील इतर शब्द शोधा.

४. फार आश्चर्य वाटणे या अर्थी 'तोंडात बोट घालणे' असेही म्हणतात. खालील (अ), (आ), (इ) व (ई) यांमधील शब्दांचे अर्थ सांगण्यासाठी पाठात कोणकोणते शब्द वापरले आहेत, ते लिहा.

(अ) अतिशय त्रास देणे. (आ) फार भीती वाटणे.

(इ) संकट टळल्याचे समाधान वाटणे. (ई) विजय मिळवणे.

५. अरण्याचे अथवा वाघाचे चित्र काढा.



# १०. मी आहे रेडिओ

रात्रीची वेळ. आम्ही रेडिओसमोर बसलो होतो. मी मुलांना म्हटले, "एक कोडं घालू का ?"

मुले ओरडली, "घाला."

मी म्हणालो, "ऐका. तो घरचा आहे; पण नात्याचा नाही. त्याला जीव आहे; पण तो जिवंत नाही. तो गप्प झाल्यावर आपल्याला चैन पडत नाही; पण ओरडला तर राग येतो. ओळखा पाहू कोण ?"

मुलांनी खूप विचार केला. त्यांना उत्तर सुचेना. ती म्हणाली, "मामा, हरलो."

मी कोड्याचे उत्तर सांगणार इतक्यात रेडिओ सुरू झाला. रेडिओवर मुलांसाठीच कार्यक्रम सुरू होता. त्यातून आवाज आला, "कोड्याचं उत्तर रेडिओ."

मी रेडिओकडे पाहिले. रेडिओनेच उत्तर दिले होते. मी म्हणालो, "तू का रे मध्ये बोललास?"

रेडिओ म्हणाला, "मामा! मुलं मला फार आवडतात. मी माझी गोष्ट त्यांना सांगू का?"

मुले ओरडली, "सांग–सांग."

मग रेडिओच स्वतःची गोष्ट सांगू लागला. तो म्हणाला, "मुलांनो! माझा जन्म साठ-एक वर्षांपूर्वी झाला. आरंभी मला बोलता येत नव्हतं. जगदीशचंद्र बोस व मार्कोनी यांनी मला बोलायला शिकवलं. तुम्हांला आश्चर्य वाटेल; पण खूप दूरवर बोलणाऱ्याचा आवाज क्षणभरही उशीर न लावता मी तुम्हांला ऐकवतो. हेच पाहा ना, लंडन शहर किती दूर! साता समुद्रांपलीकडे! पण तिथली बातमी तुम्हांला तावडतोब ऐकायला मिळते. मी नुसत्या बातम्याच देतो, असं नव्हे. मी आणखीही खूप खूप कामं करतो. सांगा पाहू कोणती ती?"

मीना म्हणाली, "तू बासरी वाजवतोस."

बंडू म्हणाला, "तू क्रिकेटच्या सामन्याचं वर्णन करतोस."

रेडिओ म्हणाला, "ही कामं तर मी करतोच; पण माझी इतरही खूप कामं आहेत. पूर आला की मी त्याचा इशारा देतो. जहाज बुडू लागलं की मी इतर जहाजांना मदतीसाठी बोलावून घेतो. वादळ, पाऊस येणार असेल तर त्याची आगाऊ सूचनाही मी देतो. तेनसिंग एव्हरेस्ट शिखर चढून गेला ना? ते मीच प्रथम सर्वांना सांगितलं!

"लोकांना शिकवण्याचंही काम मी करतो. चांगलं पीक कसं काढावं हे सांगतो. शेतकरी आपल्या शंका मला विचारतात. मी त्यांना सल्ला देतो. कोणी शेतकरी चांगलं पीक काढतो; मी त्याचं कौतुक करतो. मग इतरही

चांगलं पीक काढू लागतात. मी भजनं म्हणतो. लोकांना ती फार आवडतात.

"सकाळी भूपाळी म्हणून मी लोकांना उठवतो. रविवारी मुलं माझ्याभोवती गोळा होतात. मग मी त्यांच्यासाठी गाणी म्हणतो. गोष्टी सांगतो. दिवसभर अधूनमधून माझे कार्यक्रम सुरूच असतात. रोज नेमाने मी बातम्या सांगतो; गाणी म्हणतो; निरनिराळ्या सणांची माहिती देतो. एवढंच नव्हे, तर तुमच्या अभ्यासाचे पाठही मी घेतो. तुमचे मामा म्हणाले ते खरं आहे. मी नात्याचा नाही; पण 'घरचाच' आहे."

इतक्यात घड्याळाचे ठोके वाजले. रेडिओ म्हणाला, "मुलांनो! आता आपला कार्यक्रम संपला. पुन्हा आपली भेट उद्या सकाळी. नमस्ते!"



✤ ✤ ✤

**अभ्यास :**

१. रेडिओ आपल्यासाठी काय काय करतो?

२. रेडिओला घरचाच असे का म्हटले आहे?

३. रेडिओचा शोध कोणी लावला? काही भारतीय शास्त्रज्ञांची नावे सांगा.

४. मुलांसाठी होणारे रेडिओवरील कार्यक्रम ऐकून त्यांची नोंद ठेवा.

# ११. पऱ्यांचे गाणे



चल, चल, धरतीवर उतरू
छुम् छुम् छननन नाच करू !
मी पहिली, ही दुसरी !
मी दुसरी, ही तिसरी !
सुंदर पंख हळू पसरू,
छुम् छुम् छननन नाच करू !

रात पडे, चांद चढे,
ओरडती रातकिडे,
हलती, डुलती तालतरू,
छुम् छुम् छननन नाच करू !

गवत किती मउ हिरवे !
चल, मिळवू हळु तळवे.
लगबग लगबग हात धरू,
छुम् छुम् छननन नाच करू !

गगन वरी नाच करी,
जग अवघे फेर धरी !
नाच आमुचा होय सुरू,
छुम् छुम् छननन नाच करू !

घ्या गिरकी, घ्या फिरकी,
पूर्व दिशा हो भुरकी !
दहिवर दिसता परत फिरू,
छुम् छुम् छननन नाच करू !

**अभ्यास :**

१. पऱ्या धरतीवर कशासाठी येणार होत्या ?
२. रात्री घडलेल्या कोणकोणत्या गोष्टी कवीने या कवितेत सांगितल्या आहेत ?
३. पऱ्यांच्या बरोबर कोणकोण नाचू लागले ?
४. पहाट झाली, हे कोणत्या ओळीवरून तुमच्या लक्षात येते ?

# १२. महात्मा जोतिबा फुले

शंभर-सव्वाशे वर्षांपूर्वीची गोष्ट.

त्या काळात आपल्या समाजात सगळ्यांना सारखी वागणूक मिळत नसे. गरीब-श्रीमंत, स्पृश्य-अस्पृश्य, स्त्री-पुरुष असे भेद करीत. मुलींना तर कोणी शाळेत घालतच नसे. अशा काळात जोतिबांनी पुण्यात मुलींसाठी पहिली शाळा काढली. अस्पृश्यांना स्वतःच्या घरात प्रवेश दिला. त्यांच्यासाठी रात्रीच्या शाळा काढल्या. सगळ्यांचे अज्ञान दूर व्हावे म्हणून प्रयत्न सुरू केले. हे काहींना सहन झाले नाही. त्यांनी जोतिबांचा अनेक प्रकारे छळ केला.

एकदा असे घडले. मध्यरात्रीची वेळ होती. जिकडे तिकडे सामसूम झाली होती. काळाकुट्ट अंधार पसरला होता. अशा वेळी दोन माणसे जोतिबांच्या घरात शिरली. त्यांच्या हातांत नंग्या तलवारी होत्या. त्यांची चाहूल लागताच जोतिबा जागे झाले. ते उठून बसले. जोतिबांनी विचारले, "कोण ते ? कोण आहे ?" आणि लगेच त्यांनी कंदिलाची वात मोठी केली. पाहतात, तो दोन भली धिप्पाड माणसे हातांत तलवारी घेऊन त्यांच्यासमोर उभी ! त्यांना पाहून जोतिबा थोडे कचरले. एवढ्यात त्यांच्या कानांवर शब्द पडले, "तुमचा खून करण्यासाठी आम्ही आलो आहोत !"

आता मात्र जोतिबा गडबडले नाहीत. त्यांनी उलट प्रश्न केला, "पण कशासाठी तुम्ही मला ठार मारणार आहात ? मी असा तुमचा कोणता गुन्हा केला आहे ?"

मारेकरी त्यांच्या या प्रश्नाला काय उत्तर देणार ? ते गडबडले. एकमेकाच्या तोंडाकडे पाहू लागले. मग एक जण म्हणाला, "तसं बघायला गेलं तर तुम्ही आमचं काही वाईट केलं नाही."

"मग कशासाठी तुम्ही मला ठार मारणार आहात ?"



आता त्यांना सांगणे भागच होते. त्यांनी उत्तर दिले, "काही लोकांनी तुम्हांला ठार मारा असं आम्हांला सांगितलं, म्हणून आम्ही आलो."

जोतिबांनी शांतपणे विचारले, "पण मला मारून तुम्ही काय मिळवणार आहात? यात तुमचा काय फायदा?"

एक जण म्हणाला, "आम्हांला एक एक हजार रुपये मिळणार आहेत."

ते ऐकून जोतिबांनी क्षणभर विचार केला आणि ते त्यांना म्हणाले, "बाबांनो, माझ्या मृत्यूमुळे तुमचा असा फायदा होणार असेल, तर मला खुशाल मारा. गोरगरीब लोकांसाठी मी आजवर कष्ट करीत आलो. त्याच लोकांच्या हातून मरण येणार असेल, तर ते मी माझं मोठं भाग्य समजेन. माझं सारं आयुष्य तुमच्यासाठीच आहे." आणि त्यांनी आपली मान मारेकऱ्यांच्या पुढे वाकवली.

मारेकरी गोंधळून गेले. त्यांचे मन चरकले. जोतिबांचे धैर्य पाहून मारेकऱ्यांच्या हातांतील तलवारी गळून पडल्या. मारेकरी भानावर आले. आपली चूक त्यांच्या ध्यानी आली. ते दोघेही जोतिबांच्या पायाला स्पर्श करून म्हणाले, "तात्यासाब, आमचा गुन्हा पोटात घालावा."

जोतिबा हे खरोखरच महात्मा होते. ते म्हणाले, "हे पाहा, आता जे घडलं ते कुठंही बोलू नका. इतकंच काय, पण ज्यांनी तुम्हांला इथं पाठवलं त्यांचीही नावं कुणाला सांगू नका. अरे, आपण काय करीत आहोत, हे त्यांना तरी कुठं माहीत आहे?"

ते दोन मारेकरी म्हणजे रोडे नावाचा एक रामोशी व दुसरा धोंडिराम नामदेव कुंभार. ते पुढे जोतिबांचे भक्त बनले. त्यांच्या रात्रीच्या शाळेत ते दोघे जण दाखल झाले. रोडे हा त्यांचा संरक्षक झाला आणि धोंडिराम नामदेव कुंभार हा शिकून मोठा पंडित झाला.

* * *

**अभ्यास :**

१. जोतिबांनी समाजासाठी कोणकोणती कामे केली?

२. मारेकरी कोण होते? त्यांनी जोतिबांचा खून का केला नाही?

३. जोतिबांच्या बोलण्याचा मारेकऱ्यांवर कोणता परिणाम झाला?

४. जोतिबांचे कोणकोणते गुण या पाठात दिसून येतात? त्यांना महात्मा का म्हणतात?

# १३. गारुडी

दुपार झाली होती. गावचा बाजार भरत होता. गारुड्याने बाजारला जाण्याची तयारी केली. त्याने आपल्या खेळातील अजगर व नाग यांची डालगी-टोपली बाजूच्या काठीला अडकवली. गारुड्याने ती कावड आपल्या खांद्यावर घेतली आणि तो पुढे निघाला. त्या ओझ्याने तो लवू लागला.

त्याच्या थोरल्या मुलानेही एक मोठी पोतडी आपल्या खांद्यावर घेतली आणि तोही निघाला. त्याच्या पाठोपाठ त्याचा धाकटा मुलगा आणि बायकोही चालू लागली.

गारुडी आपला खेळ घेऊन बाजारच्या पटांगणात आला. त्याने आपल्या खांद्यावरची डालगीं-टोपली खाली उतरवली. पोतडीतून पुंगी काढली. पायांत घुंगरांचा चाळ बांधला. तो पुंगी वाजवत तालात नाचू लागला. बाजारकरी आणि मुलेबाळे पुंगीच्या आवाजाच्या दिशेने धावू लागली. गारुड्याच्या भोवती गर्दी जमली.

"गारुड्याचा खेळ, गारुड्याचा खेळ!" असा मुलांनी आरडाओरडा केला. गारुड्याच्या भोवती मुलांनी घोळका केला. गारुडी पुंगीच्या तालात आपल्या पायांतील चाळ आपटत नाचू लागला. लोकांनी गर्दी केलेली पाहून गारुड्याने खेळाला सुरुवात केली. पुंगी वाजवून त्याने मोठी टोपली उघडली. त्यातून भला मोठा लांबच्यालांब अजगर बाहेर काढला. तो अजगर आपल्या खांद्यावर घेऊन गारुड्याने एक गोल फेरी मारली. तो अजगर पाहून मुले बिचकली. न सांगता जरा मागे सरून उभी राहिली. त्या अजगराला पाहून काही जण म्हणाले, "अबब! केवढं मोठं हे जनावर!"

दुसरा एक जण म्हणाला, "अरे, तो अख्खा कोंबडा गिळतो! माणसाला करकचून ठार मारतो!"



असा भला मोठा अजगर मिरवून झाला. मग त्याला खांद्यावरून खाली सोडता सोडता गारुड्याने उगाच गमतीने भीतीची हुलकावणी दिली; त्यावर लोक दचकले. दाटीदाटीने उभी राहिलेली मुले एकमेकांना धडकली.

गारुडी पुन्हा पुंगी वाजवू लागला. पुंगीच्या नादात नाचू लागला.

मग त्याने हळूच दुसऱ्या टोपलीचे झाकण काढले; आणि तो मोठ्याने म्हणाला, "चल, चल, राजा ! चल !"

मग काय विचारता ! त्या टोपलीतून पिवळाजर्द नाग फडा काढून उभा राहिला. पुंगीच्या तालावर डोलू लागला. त्या फड्या नागाला पाहताच काही जणांनी हात जोडून भक्तिभावाने नमस्कार केला. काही त्याला पाहण्यात दंग होऊन गेले. पुंगी वाजत होती. पायांतील चाळांचा आवाज निनादत होता. नाग डोलत होता आणि देहभान विसरून लोक खेळ पाहात होते. गारुडी आपल्याभोवती जमलेल्या सर्व लोकांना हात जोडून म्हणाला, "लहान थोर, सात्र-सावकार, तालेवार लोक, द्या पैसा दोन पैसे ! मनाच्या खुशीनं द्या !"

लोकांचे हात खिशांत जाऊ लागले. त्या नागाच्या फड्यावर भराभर पैसे पडू लागले. गारुड्याची पोरे पटापट पैसे उचलू लागली. एका पोराने हातात ताटली घेतली आणि तो त्या गर्दीत पैसे मागत हिंडू लागला. त्या ताटलीत कोणी पैसा–दोन पैसे टाकू लागले. ताटलीत पैसे पडत होते त्यांचा खळखळ आवाज होत होता. ताटली फिरवून झाली. गारुड्याचा खेळ संपला. लोक आपापल्या कामाला निघून गेले.

गारुड्याने आपल्या दुपारच्या जेवणाची भाकरी तेथेच सोडली.

✤ ✤ ✤

तालेवार – श्रीमंत.

**अभ्यास :**

१. खेळ करण्यासाठी गारुड्याने कोणत्या गोष्टी बरोबर घेतल्या होत्या ?

२. अजगराला पाहून लोक काय काय म्हणाले ?

३. नाग डोलत असताना गारुडी व लोक काय काय करीत होते ?



# १४. दूर दूर माझे घर

दूर दूर माझे घर जोगाईच्या पलीकडे,
पाठ राखती तयाची डोंगराचे उंच कडे !
दूर दूर माझे घर गर्द राईच्या पल्याड,
घुमतसे कानी माझ्या राघू, कोकिळेची साद !
दूर दूर माझे घर वाट आडवळणाची,
मधे जमलीसे गर्दी किती ओहळ-नाल्यांची.
दूर दूर माझे घर आजोबाने बांधलेले
जरी जुनाट पडके, गणगोत सांभाळले.
दूर दूर माझे घर शेत इवले शेजारी,
पिकवितो बाप माझा तिथे जोंधळा बाजरी.

दूर दूर माझे घर
मज दळण दळता
दूर दूर माझे घर
बोलाविते खेळायाला
दूर दूर माझे घर
कधी रुसते, पेटते
दूर दूर माझे घर
उडे धमाल गाण्याची
दूर दूर माझे घर
राखणीस रातकिडे

घरी निजविते आई,
गात गोडशी अंगाई.
घरी बहीण सानुली,
तिजसंगे भातुकली.
घरी शेळी, गाय, बैल,
तीन दगडांची चूल.
तिथे कधी सणावारी,
नाचण्याची रातभरी !
उभे चांदीच्या रसात,
किरकिरती जोसात !



**अभ्यास :**

१. कवीने आपल्या घरातील कोणकोणत्या व्यक्तींचे वर्णन केले आहे ?
२. कवीला आपल्या घराबद्दलच्या कोणकोणत्या आठवणी येतात ?
३. तुमच्या घराविषयी सात-आठ ओळी लिहा.



# १५. दसरा सण मोठा

बाबा बाहेरून आले. त्यांनी माधवला बोलावले आणि ते म्हणाले, "माधव, हे घे पेढे."

"कशाचे बाबा हे पेढे?"

"अरे, आपल्या अरविंदानं आज दसऱ्याच्या शुभमुहूर्तावर नवं दुकान उघडलं."

माधव हसून म्हणाला, "वा! बाबा, आज पेढ्यांची चंगळ झाली. तुम्हांला ठाऊक आहे ना! आमच्या शाळेची नवी इमारत गांधी पटांगणावर होणार आहे. आज त्या ठिकाणी भूमिपूजन झालं. सारे विद्यार्थी जमले होते. महापौरांनी पूजा केली. मग पेढे वाटले. बाबा, आजच्या मुहूर्ताला इतकं महत्त्व का आहे हो?"

"आज दसरा आहे ना? विजयादशमी. आज नवरात्र संपलं. सायंकाळी शिलंगणाला जायचं. सोनं लुटायचं."

"म्हणजे ती पानं ना—आपट्याच्या झाडाची?"

"बरोबर. या संदर्भात एक कथा आहे ती सांगतो. हा माझा कोट आत नेऊन ठेव."

माधवने कोट आत नेऊन ठेवला आणि बाबांच्या आरामखुर्चीपुढे तो

येऊन बसला. गोष्ट ऐकायला तो फार उत्सुक होता. बाबा गोष्ट सांगू लागले—

"प्राचीन काळी रघू नावाचा राजा होऊन गेला. त्यानं सर्व पृथ्वी जिंकली. मोठा यज्ञ केला. चारही दिशांना स्वाऱ्या करून आणलेली संपत्ती दान करून टाकली. रघुराजाच्या उदारपणाची कीर्ती सर्व देशात पसरली."

"एके दिवशी काय झालं ? रघुराजाच्या राजवाड्यापाशी एक ऋषिकुमार आला. त्याचं नाव कौत्स."

"बाबा, कशाला आला होता तो ?"

"सांगतो ना. वरतंतू ऋषीकडून त्यानं विद्या संपादन केली. आता गुरूचा निरोप घेताना गुरुदक्षिणा दयावी अशी त्याची इच्छा होती. पण गुरुजी म्हणाले, 'मला काही नको. तू माझी सेवा केलीस, पंडित झालास. हीच माझी गुरुदक्षिणा.' पण कौत्स हट्ट धरून बसला. तो काही केल्या ऐकेना. तेव्हा वरतंतू मुनी संतापले. ते म्हणाले, 'तुझा आग्रहच असेल तर चौदा कोटी सुवर्णमुद्रा मला आणून दे.' कौत्स ते धन मिळवण्याकरता बाहेर पडला. रघुराजासारखा दाता आपल्याला तेवढं धन देईल, म्हणून तो आला होता."

"मग पुढं काय झालं, बाबा ?"

"कौत्साला कळून चुकलं की रघुराजानं सर्व संपत्ती दान करून टाकली आहे. तेव्हा राजाची स्थिती चौदा कोटी सुवर्णनाणी देण्यासारखी नाही. रघूच्या उदारपणाबद्दल त्याची स्तुती करून कौत्स दुसरीकडे प्रयत्न करण्यासाठी जाऊ लागला; पण रघू मोठा सत्त्वशील राजा होता. आपणाकडे आलेला याचक काम न होता दुसरीकडे जाणार हे त्याला सहन झालं नाही. त्यानं कौत्साला दोन तीन दिवस आपल्या अतिथि-गृहात राहण्याची विनंती केली आणि तुमच्या गुरुदक्षिणेची व्यवस्था करतो असं सांगितलं. राजा वचनाला जागणारच अशी कौत्साला खात्री होती."

"रघुराजानं चौदा कोटी सोन्याची नाणी मिळवली का हो ?"

"ऐक ना. रघुराजा विचार करू लागला. पृथ्वीवरील राजांपासून खूपच धनभार आपण मिळवला. आता स्वर्गाचा धनपती जो कुबेर त्याच्याकडे नजर वळवली पाहिजे असं रघूनं ठरवलं. त्यानं रात्री आपला रथ तयार केला. पहाटे तो स्वर्गावर स्वारी करणार होता.

"पण काय चमत्कार! भल्या पहाटे रघुराजाचा खजानजी धावतच त्याच्याकडे आला आणि आकाशातून पडलेल्या सोन्यानं आपली तिजोरी भरून गेली आहे, असं त्यानं सांगितलं. सोन्याच्या नाण्यांचं एखादं टेकाड पडावं त्य[illegible]णं तिजोरीच्या कोठीत सोन्याचा ढिगारा पडला होता. रघूच्या भयानं कुबे[illegible]नंच एवढं सोनं तिथं टाकून दिलं होतं. रघूनं ती सर्व संपत्ती कौत्साला देऊ केली, पण कौत्सानं गुरुदक्षिणेपुरतीच त्यातील संपत्ती घेतली. दाता किती थोर आणि तसाच याचक किती निःस्पृह! आयोध्यानगरी दोघांची प्रशंसा करू लागली. कौत्स संतुष्ट झाला. तो म्हणाला, 'राजा, केवढा तुझा प्रभाव! पृथ्वीनं तर तुला अगणित संपत्ती दिलीच; पण तू स्वर्गाकडूनही आपली इच्छा पूर्ण करून घेतलीस. तुला तुझ्यासारखाच प्रतापशाली पुत्र होईल,' हा माझा आशीर्वाद आहे."





माधव गोष्ट ऐकण्यात रंगला होता. बाबा म्हणाले, "ही स्वर्गातून झालेली सुवर्णवृष्टी जणू आपट्याच्या झाडावर पडली असं आपण समजतो, म्हणून एकमेकांना सोनं देऊन हा सण साजरा करतात. पराक्रम आणि तपश्चर्या यांचा प्रभाव किती आहे हे यावरून कळून येईल. तसंच या कथेवरून निःस्पृहतेचेही माहात्म्य कळेल."

"बाबा, हा सण फार जुना आहे नाही?"

"होय. पांडवांनी शमीच्या झाडावर ठेवलेली आपली शस्त्रं काढली ती याच दिवशी. देवीनं महिषासुराला ठार केलं ते याच दिवशी. बंगालमध्ये याच वेळी दुर्गापूजेचा महोत्सव असतो."

"म्हणजे सर्व भारतभर दसरा साजरा करतात ना?"

"हो तर! कर्नाटकात याला 'नाडहब्ब' म्हणतात. आपल्याकडील भोंडल्याप्रमाणं गुजरातेत गरबा नृत्य थाटात सुरू असतं आणि रामलीला म्हणजे काय ते ठाऊक आहे का तुला? रावण आणि कुंभकर्ण या राक्षसांचे खूप मोठे पुतळे करून ते जाळतात. राक्षस म्हणजे वाईट प्रवृत्ती. त्या जाळूनच टाकल्या पाहिजेत."

"खूप मजा येत असेल नाही?"

"हो ना! या वेळी पाऊस संपलेला असतो. पिकं डोलत असतात. आकाश निरभ्र असतं. याच दिवसांत पूर्वी मराठे मुलुखगिरी करायला बाहेर पडत. शिलंगण म्हणजे सीमोल्लंघन. सीमा ओलांडून नवे पराक्रम करायला निघायचं. या वेळी आनंद, उत्साह भरून राहिलेला असतो. माधव, लहानपणी आम्ही एक गाणं म्हणत असू—

'दसरा सण मोठा—नाही आनंदा तोटा'

या वेळी त्या गाण्याची आठवण होते. जा आता. संध्याकाळी शिलंगणाच्या मिरवणुकीला जायचं आहे ना? कपाटातील नवे कपडे काढून ठेव."

माधव धावतच गेला. जाताना तो गुणगुणत होता—

'दसरा सण मोठा...'

**अभ्यास :**

१. पूर्वी दसऱ्याच्या दिवशी कोणकोणत्या गोष्टी घडल्या?
२. भारतात ठिकठिकाणी दसरा कसा साजरा करतात?
३. शिलंगण म्हणजे काय? मराठे शिलंगणास जात म्हणजे ते काय करीत?
४. दसऱ्याला 'विजयादशमी' का म्हणतात, याची माहिती मिळवा.
५. खाली दिलेल्या शब्दांचे अर्थ समजावून घ्या :
मुहूर्त, ऋषिकुमार, मुद्रा, महोत्सव, मुलुखगिरी.



# १६. रंगलेला सामना

आज शाळेतील खेळांच्या सामन्यांचा शेवटचा दिवस होता. त्यामुळे सर्व खेळांचे अंतिम सामने आज होणार होते. सामने पाहायला विद्यार्थी, शिक्षक, व अनेक पालक क्रीडांगणावर जमलेले होते.

कबड्डीच्या अंतिम सामन्यासाठी सहावी विरुद्ध सातवी हे संघ क्रीडांगणावर दाखल झाले. सर्वांनी टाळ्या वाजवून त्यांचे स्वागत केले.

ओली-सुकी झाली. सहावीच्या कर्णधाराने ओली-सुकी जिंकली. त्याने दम घालण्यास सुरुवात केली. सातवीचे खेळाडू तयारच होते. त्यांनी सहावीच्या कर्णधाराला चांगले कोपऱ्यात घेतले. कोपरा धरणाऱ्या मुलाने मोठ्या धीराने त्याची तंगडी पकडली. त्याबरोबर मधल्या भिडूने त्याच्यावर एकदम झडप घालून त्याला पकडले. प्रेक्षकांतून जोरदार आरोळ्या उठल्या. सुरुवातीपासून सामना रंगायला सुरुवात झाली.

सातवीच्या संघाचा आवेश वाढला. त्यांचा हुकमी एक्का सावंत कबड्डी घालण्यास गेला. "सावंत, पाच बाद पाहिजेत पाच!" असे काही मुले

ओरडली. सावंतच्या अंगात चांगलीच ताकद होती. त्याचे हाडपेरही मजबूत होते. पण सहावीच्या खेळाडूंनी त्याला पकडायचा निर्धार केला होता. सावंत आत आला, तशी सहावीच्या खेळाडूंनी साखळी धरली. बघता बघता त्याला त्यांनी घेरले. पण सावंत कसला वस्ताद! त्याने हां हां म्हणता साखळी तोडली व तो मध्यरेषेकडे तडफेने पोहोचला. त्याबरोबर आवाज उठले, "शाब्बास सावंत, भले बहाद्दर!" सहावीचे तीन गडी बाद झाले. प्रेक्षकांत धमाल उडाली.

मग सहावीचा चिवट सुळे कबड्डी घालण्यास गेला. मूर्ती लहान, पण कीर्ती थोर! अत्यंत सावधपणे तो खेळत होता. इतक्यात एका खेळाडूने त्याच्या तंगड्या पकडण्यासाठी समोरून मुसंडी मारली. चिवट सुळेने त्याच्या पाठीवर हात ठेवून टुणकन उडी मारली व तो आपल्या संघाकडे सफाईने निघून गेला. "शाब्बास सुळे!" मुलांनी आरोळ्या ठोकल्या. सहावीचा कर्णधार जिवंत झाला.

सातवीच्या कर्णधाराने 'घाई करू नका!' असा खेळाडूंना इशारा दिला. आपला एक चपळ गडी दम घालण्यास पाठविला. सहावीचा एक गडी बाद करून तो चपळाईने परत आला. मग सहावीचा खेळाडू कबड्डी घालण्यास गेला. "अरे, याला धरा!" असा प्रेक्षकांतून आवाज आला. पण या वेळी तो फारच सावध होता. पुन्हा चूक करावयाची नाही, असे त्याने ठरवले होते. एकही गडी न मारता तो परत आला.

सावंत या वेळी मोठ्या रुबाबात पुन्हा कबड्डी घालण्यास गेला. त्याचा दम संपत आला, इतक्यात सहावीच्या कर्णधाराने त्याची तंगडी पकडली. त्याबरोबर त्याने चपळाई केली; पण खेळाडूंनी त्याला मिठी मारून एकदम उचलले. त्याचा नाइलाज झाला. सावंत बाद झाला. प्रेक्षकांनी टाळ्यांचा प्रचंड कडकडाट केला. सहावीची मुले आता नाचू लागली. यशाचे पारडे कधी या बाजूला तर कधी त्या बाजूला झुकत होते. खेळ सुरू होऊन दहा मिनिटे झाली; पंचांनी शिटी फुंकून मध्यंतरासाठी खेळ थांबवला.

पुन्हा पाच मिनिटांनी खेळाला सुरुवात झाली. या वेळी बाजू बदलली गेली. सहावीचा कर्णधार आपल्या भिडूंना म्हणाला, "घाबरू नका. कमी गुण मिळाले तरी हरकत नाही; आत्मविश्वासाने खेळा. आपण सातवीला हरवणारच."

सहावीचा संघ चढाईचा खेळ खेळू लागला. सातवीचा संघ घाई न करता खेळत होता. त्या संघास पहिल्या डावात जे अधिक गुण मिळाले होते, ती सरशी त्यांना टिकवायची होती.

सहावीच्या संघाने मात्र सातवीच्या खेळाडूंना निदान-रेषाच ओलांडू द्यावयाची नाही, असा चंग बांधला होता. रेषा न ओलांडणारा गडी बाद होत असे. ती ओलांडण्याचा जो प्रयत्न करील, त्याला ते जिद्दीने पकडू लागले. त्यांच्या अंगात नुसता जोम संचारला होता! सातवीचा कर्णधार सावंत आणि राहिलेले पाच खेळाडू हे सर्वच्या सर्व बाद झाले. सातवीवर लोण चढले, तेव्हा एकच जल्लोष झाला. आता वेळही फार थोडा होता. दोन्ही संघ अटीतटीने खेळत होते.

खेळाची वेळ संपली. पंचांनी शिटी फुंकली. खेळ थांबला. सहावीचा विजय झाला होता. सातवीचा संघ हरला होता. पण दोन्ही संघांच्या कर्णधारांनी एकमेकांना मिठ्या मारल्या. प्रेक्षकांनी टाळ्या वाजविल्या. गुरुजींनी येऊन दोन्ही संघांना शाबासकी दिली. सर्वांची पाठ थोपटली.

सामना किती रंगला होता! भांडण नाही की तंटा नाही; पण खेळात जोष किती! सामना असावा तर असाच!

❦ ❦ ❦

**अभ्यास :**

१. खेळ पुन्हा सुरू झाल्यानंतर सहावीचा कर्णधार भिडूंना काय म्हणाला?

२. गुरुजींनी दोन्ही संघांना शाबासकी का दिली?

३. तुम्ही पाहिलेल्या एका सामन्याचे दहा ओळींत वर्णन करा.

४. अर्थ समजावून घ्या : (अ) भिडू, मध्यंतर, कर्णधार, प्रेक्षक, ओलीसुकी.
(आ) अटीतटीवर येणे, दम घालणे, मुसंडी मारणे, कोपरा धरणे.



# १७. देहू–आळंदी

पुण्यापासून काही अंतरावर उत्तरेला इंद्रायणी नदी आहे. तिच्या काठी देहू व आळंदी ही दोन तीर्थक्षेत्रे आहेत. देहू म्हणताच तुकाराम महाराजांची आठवण होते. आळंदी म्हटले की ज्ञानेश्वरांचे स्मरण होते. प्रथम आपण आळंदीस जाऊ या. लोक नेहमीच म्हणतात, "चला आळंदीला जाऊ! ज्ञानदेवा डोळा पाहू."

ज्ञानेश्वरांच्या समाधीच्या दर्शनासाठी लोक मोठ्या भक्तिभावाने आळंदीस येतात. ज्ञानेश्वरांनी 'ज्ञानेश्वरी' नावाचा ग्रंथ लिहिला आहे. त्यात त्यांनी लोकांना भक्तीचा मार्ग दाखवला आहे. माणुसकीचा धर्म शिकवला आहे.



देऊळवाडा हे आळंदी येथील मुख्य मंदिर. यातच ज्ञानेश्वर महाराजांची समाधी आहे. देऊळवाड्यात प्रवेश करताना जी पहिली पायरी लागते, तिला हैबतरावांची पायरी असे म्हणतात. हैबतराव नावाच्या एका भक्ताने या पायरीशी आपला देह ठेवला. मंदिरात गेल्यावर आपल्याला ज्ञानेश्वर महाराजांच्या समाधीचे दर्शन होते. याच ठिकाणी सुमारे सातशे वर्षांपूर्वी ज्ञानेश्वर महाराजांनी समाधी घेतली होती. या समाधीवर डोके ठेवले, की वारकरी लोकांना जणू देव भेटल्याचा आनंद होतो. सगळी दुःखे ते विसरून जातात. ज्ञानेश्वरांच्या या मंदिरातच विठ्ठल–रखुमाई, गणपती, मुक्ताबाई, सिद्धेश्वर यांचेही दर्शन घडते. येथे काही लोक ज्ञानेश्वरीचे पारायण करताना आढळतात. देऊळवाड्यात नेहमीच भजन, पूजन, कीर्तन चालू असते. इंद्रायणी नदीच्या काठी भक्त पुंडलिकाचे मंदिर आहे.

आळंदीपासून पश्चिमेस काही अंतरावर तुकाराम महाराजांचे देहू गाव आहे. येथे विठ्ठल-रखुमाईचे एक सुंदर देऊळ आहे. सावळ्या, गोजिऱ्या विठोबाला तुकारामबुवांनी हजारो अभंग रचून आळविले आहे. अहोरात्र त्यांना विठ्ठलाचा ध्यास होता. अनेक कीर्तने करून त्यांनी लोकांना भक्तीचा मार्ग दाखवला.



इंद्रायणीच्या काठावर असलेल्या या देहू गावात अनेक लहानमोठी

मंदिरे आहेत. विठ्ठलाच्या मंदिराजवळ तुकोबांचे घर होते. ते आजही तेथे पाहायला मिळते. ज्ञानेश्वरांचा व तुकारामबुवांचा जयघोष आजही आपण करीत असतो. 'ग्यानबा-तुकाराम' 'ग्यानबा-तुकाराम', म्हणत आजही लाखो वारकरी स्वतःला विसरतात व विठ्ठलाच्या भक्तीत रंगून जातात. ज्ञानेश्वरांच्या 'ज्ञानेश्वरी' प्रमाणेच तुकाराम महाराजांच्या अभंगांची गाथा प्रसिद्ध आहे. या गाथेत त्यांचे सर्व अभंग एकत्र केलेले आहेत.



❖ ❖ ❖

## अभ्यास :

१. आळंदीच्या देऊळवाड्यात कोणाकोणाचे दर्शन घडते ?

२. ज्ञानेश्वरांच्या समाधीवर डोके ठेवताना वारकऱ्यांना का समाधान वाटते ?

३. योग्य जोड्या लावा :

| | |
|---|---|
| ज्ञानेश्वर | विठ्ठल |
| तुकाराम | ज्ञानेश्वरी |
| आळंदी | ज्ञानेश्वरांची समाधी |
| देहू | तुकोबांचे घर |
| पंढरपूर | अभंग-गाथा. |



# १८. लेझीम

दिवस सुगीचे सुरू जाहले
ओला चारा, बैल माजले
शेतकरी-मन प्रफुल्ल झाले
छन् खळ् खळ् छन्
ढुम् ढुम् पट ढुम्
लेझिम चाले जोरात !

दिवटी फुरफुर करू लागली
पटक्यांची वर टोके डुलली
रांग खेळण्या सज्ज जाहली
छन् खळ् खळ् छन्
ढुम् ढुम् पट ढुम्
लेझिम चाले जोरात !

भरभर डफ तो बोले घुमुनी
लेझिम चाले मंडल धरुनी
बाजुस, मागे, पुढे वाकुनी
छन् खळ् खळ् छन्
ढुम् ढुम् पट ढुम्
लेझिम चाले जोरात !

पहाट झाली, तारा थकल्या,
मावळतीला चंद्र उतरला
परी न थकला लेझिम-मेळा
छन् खळ् खळ् छन्
ढुम् ढुम् पट ढुम्
लेझिम चाले जोरात !



सुगी – हंगाम. मंडल धरणे – फेर धरणे.

**अभ्यास :**

१. शेतकऱ्याचे मन प्रफुल्ल का झाले ? २. सुगीचे दिवस कोणते ?
३. लेझीम-मेळा किती वेळ चालला होता ? तो का थकला नाही ?



# १९. शिवाराची श्रीमंती

आर्द्रा नक्षत्रावर पेरलेली जिराईत जमिनीतील बाजरी चांगली वाढली. पोटरीतून लांब दांड्याची शेलाटी कणसे बाहेर पडली आणि लवकरच जांभळ्या फुलोऱ्याने फुलून गेली. मधमाशा कणसांभोवती फिरू लागल्या. पिवळ्या रंगाची फुलपाखरे जोडीजोडीने तरंगत येऊन कणसांवर बसू लागली.

बाजरीबरोबर पेरलेले कडधान्याचे वेल पसरू लागले. मटकीच्या शेंगांचे झुपके दिसू लागले. हुलग्याला जोम आला. तुरीच्या उभार झाडावर सावळ्या शेंगा दाण्यांनी भरू लागल्या. भुईमुगाच्या मुळ्या अंडी धरू लागल्या.

लवकरच जांभळ्या फुलोऱ्याने डवरलेली कणसे बाजरीच्या चमकदार दाण्यांनी टचटचली. चिवळीचे थवे भरारत येऊन ते दुधाने भरलेले दाणे खाऊ लागले.

बाजरी चांगली तयार झाली. दसरा आला. शिलंगणाच्या सोन्याबरोबर बाजरीची नवी कणसेही लोकांनी वाटली आणि मग काढणीची गडबड सुरू झाली. पाच महिने रानात उभी असलेली बाजरीची जोमदार धाटे विळ्याच्या तडाख्याने जमिनीवर झोपली. लगोलग पेंढ्या एकत्र उभ्या करून शेतकऱ्यांनी बुचड्या घातल्या. सकाळ-संध्याकाळ होले, चिमण्या त्यांवर गर्दी करू लागल्या.

ज्याला नड होती त्याने लगेच मोडणी करून कणसे बडवली. जनावरे कुरकुरीत सरमाड खाऊ लागली. घरची माणसे बाजरीच्या हिरव्यागार भाकरी खाऊ लागली.

हळूहळू कडधान्यही निघाले. मोकळ्या झालेल्या रानांतून जनावरे हिंडू लागली. बाजरीची तांबडी राने उजाड दिसू लागली.

कडक थंडी पडू लागली. चगळचोथा पेटवून लोक शेकोटी घेऊ लागले. गारव्याने त्यांची तोंडे तडकली; ओठ फुटले.

ओढ्याच्या निवळशंख पाण्यावर सकाळच्या प्रहरी धुके तरंगताना दिसू लागले.

दरम्यान, श्रावणमासी पेरलेली ज्वारी बळावली. धाटे कमरेला लागू लागली. मध्ये घातलेले करडयाचे पट्टे काट्याला आले. हरबऱ्याला जांभळी फुले आली आणि बघता बघता ज्वारीची गोंडेदार कणसे दिसू लागली. करडयाला पिवळी केशरी फुले आली. हरबऱ्याला पोचट घाटे लोंबू लागले.

हिरवे बाटूक खाऊन जनावरे बैदुलासारखी गोल गरगरीत झाली. शिंगांनी माती उकरून डिरक्या मारू लागली.

भल्या सकाळी रानारानांत पेटलेल्या आगट्यांचा धूर आभाळात चढू लागला. तरण्या पोरांनी हुरड्याचा खुराक सुरू केला. म्हातारेकोतारे सुद्धा कुटून हुरड्याची चव घेऊ लागले. बायका–मुली सवड काढून चार दाणे तोंडांत टाकू लागल्या.



दरसाल या दिवसांत येणारी परदेशी पाखरे बोलावणे धाडल्यासारखी आली. क्राँव, क्राँव आवाज करीत त्यांचे थवे निळ्या स्वच्छ आभाळातून उडू लागले. उंच उंच पायाची ही पाखरे पिकावर पडू लागली. गोफणीने धोंडे फेकून व डब्याचा, आसुडाचा आवाज करून शेतकरी त्यांना उठवू लागले.

फुलांवरील मध गोळा करून मधमाशांनी अडचणीच्या जागी पोळी केली. डहाळ्या पाडण्याच्या कुऱ्हाडी घेऊन पोरे राने वेधू लागली. पोळी शोधून त्यांतील गोड मध खाऊ लागली.

मग ज्वारीची पिके निघाली. करडा निघाला. हरभरा निघाला. खळ्याची धमाल सुरू झाली. लोकांनी खळी शिंपली. तिवडा रोवला. बायकांनी कणसे मोडली. शेतकऱ्यांनी बैल जोडून पात घातली. उफणणी झाली. वाऱ्याबरोबर भुसा उडून गेला आणि मोत्यासारख्या शुभ्र ज्वारीच्या राशी खळ्यांत पडल्या.

शेतकऱ्यांनी राशी मोजल्या. पोती भरली. पाखरांनी व गुरांनी खाऊन उरले ते धान्य शेतकऱ्यांच्या घरी आले.

सुगी संपली. पाखरे पांगली. रानांतली कामे कमी झाली. लोक घटका घटका निवांत बसू लागले.

कोल्हाटी, दरवेशी-गारुडी लोक गावात येऊन चावडी-देवळापुढे खेळ करू लागले. लोक गर्दी करून बघू लागले.

गावातील धनगरांची तरुण मुले गोळा होऊन गजी नाचू लागली. त्यांनी रंगीबेरंगी रुमाल दोन्ही हातांत घेतले आणि मोठा फेर धरला. पिपाणी वाजू लागली. झांज वाजू लागली. हातांतले हिरवे, तांबडे रुमाल हवेत उडवीत धनगर धुंद होऊन नाचू लागले.

फेराच्या मध्यभागी भला मोठा ढोल गळ्यात घेऊन उभा राहिलेला ढोल्या ढोल घुमवू लागला—

इडिबांग ... डिपांग ... डिबीवाडी डिपांग... डिपांग डिपांग....

* * *

बुचड्या – बाजरीच्या पेंढ्यांची शंकूसारखी केलेली रचना. सरमाड – बाजरीची वाळलेली ताटे. निवळशंख – अतिशय स्वच्छ. बाट्रक – जोंधळ्याची हिरवी कोवळी ताटे. तिवडा – मळणीचा खांब. गजी – एक प्रकारचा नाच. करडा – करडई.

**अभ्यास :**

१. या पाठात कोणकोणत्या पिकांची नावे आली आहेत ?

२. ज्वारी व बाजरी या पिकांचे वर्णन करणारे शब्द शोधा.

३. सुगीत कोणकोणती कामे करावी लागतात ?

# २०. संत कबीर

कितीतरी वर्षांपूर्वींची गोष्ट. उत्तर प्रदेशात वाराणशी नावाचे एक प्रसिद्ध तीर्थक्षेत्र आहे. तेथे नीरू नावाचा एक विणकर राहात असे. तो मोठा कष्टाळू व सदाचारी होता. तो आणि त्याची पत्नी दिवसभर विणकाम करून आपले पोट भरत. शेजाऱ्यापाजाऱ्यांचा त्यांच्यावर फार लोभ होता. त्यांना मूलबाळ नव्हते.

एके दिवशी मोठ्या पहाटे नीरू बाहेर पडला. गावाबाहेर तलाव होता. तेथे तो गेला. इतक्यात त्याला लहान मुलाचे रडणे ऐकू आले. त्या दिशेने तो पुढे गेला. पाहतो तो, तेथे एक लहान मूल रडत पडलेले! त्याने त्याला हळूच उचलले आणि आपल्या छातीशी घेतले. मूल रडायचे थांबले. तो घरी आला आणि पत्नीला म्हणाला, "बघ, आज सकाळीच आपल्याला देवानं हा प्रसाद दिला."

"छान आहे मुलगा. मी त्याला माझ्या मुलाप्रमाणंच वागवीन."

त्यांनी मुलाचे नाव कबीर असे ठेवले. हाच मुलगा पुढे थोर संत झाला.

कबिराला शाळेतले शिक्षण मिळू शकले नाही. घरी मात्र त्याला चांगले वळण लागले. देवाची भक्ती तो लहान असतानाच करू लागला. कोणालाही मदत करायला तो तयार असे. सर्वांवरच तो प्रेम करी. कोणाचेही दुःख तो आपलेच समजे. ते दूर करायला झटत असे. विणकाम तर तो उत्तमच करू लागला.

कबीर जसा मोठा झाला तसा पैसेही मिळवू लागला; पण श्रीमंत होण्यासाठी त्याची धडपड नव्हती. पोटापुरते मिळवावे व रामाची भक्ती करावी एवढेच त्याला माहीत. विणकाम करतानाही त्याला रामाचा कधी विसर पडला नाही. रात्रंदिवस त्याला रामाचाच ध्यास लागलेला. त्याला आता लोक संत म्हणून ओळखू लागले.

कबिरांना चांगले लिहितावाचता येत नव्हते; पण ते कविता रचत.



विणताविणता त्यांनी कितीतरी पदे व दोहे रचले आहेत. तुम्ही पहिलीत, दुसरीत असताना काही अभंग वाचले आहेत. त्यांत देवाची भक्ती आहे. लोकांना चांगले वागण्याचा उपदेश आहे. या अभंगांसारखेच कबिरांचे दोहे आहेत. 'आपण सारे एकाच परमेश्वराची लेकरे आहोत. आपण भेदभाव ठेवू नये. आचरण चांगले ठेवावे. ईश्वरावर श्रद्धा ठेवावी.' असा उपदेश त्यांनी या दोह्यांतून केला आहे.

कबीर जसे बोलत तसे वागत. ते अत्यंत दयाळू होते. एके दिवशी त्यांनी कापड विणले आणि ते विकण्यासाठी ते घराबाहेर पडले. वाटेत त्यांना एक गरीब भिकारी भेटला. त्याच्या अंगावरील कपड्याच्या नुसत्या चिंध्या झाल्या होत्या. ते पाहून कबिरांना अत्यंत वाईट वाटले. त्यांना त्या

भिकाऱ्याची दया आली. त्यांनी आपल्याजवळच्या कापडापैकी निम्मे कापड त्या भिकाऱ्यास देऊन टाकले. तेव्हा तो भिकारी म्हणाला, "महाराज, एवढंसं कापड मला कसं पुरणार?" हे ऐकून कबिरांनी उरलेले कापडही त्या भिकाऱ्याला देऊन टाकले! बाजारात कापड विकायला गेलेले कबीर रिकाम्या हातानेच घरी परतले; पण परतताना त्यांना किती समाधान वाटत होते!

एकदा ते गंगेच्या तीरावर गेले. तेथे एक मठ होता. कबीर त्या मठात गेले. तेथे एक स्त्री बैराग्यांच्या भिक्षापात्रांत दूध वाढत होती. कबिरांनाही तिने एका पात्रात दूध दिले. सर्व बैराग्यांनी दूध पिऊन आपापली पात्रे रिकामी केली; कबिरांचे पात्र मात्र जसेच्या तसे काठोकाठ भरलेले होते! ते पाहून तिने कबिरांना विचारले, "महाराज, आपण दूध का घेतलं नाही?"

त्यावर कबीर म्हणाले, "तो पाहा, मठाबाहेर एक आंधळा बसला आहे. उपाशी आहे तो. त्याला या दुधाची अधिक गरज आहे. साधू काय आणि आंधळा काय, राम काय, रहीम काय, सारे एकच आहेत. आपण सारे एकाच ईश्वराची लेकरं आहोत."

'भाव तेथेच देव असतो. आपण मनापासून भक्ती केली तर ईश्वर प्रसन्न होतो. चांगले काम हाती घ्यावे व ते उत्तम प्रकारे करावे. सर्वांवर प्रेम करावे. खरे बोलावे.' असे ते नेहमी म्हणत.

❖ ❖ ❖

**अभ्यास :**

१. लहानपणापासूनच कबिरांच्या अंगी कोणते विशेष गुण दिसून आले?

२. कबिरांनी आपल्याला मिळालेले दूध आंधळ्याला का दिले?

३. रिकाम्या हाताने घरी परतल्यावरही कबिरांना समाधान का वाटत होते?

४. संत कबीर लोकांना कोणता उपदेश करीत असत?



# २१. गाणे अमुचे जुळे

टप् टप् पडती अंगावरती प्राजक्ताची फुले
भिर् भिर् भिर् भिर् त्या तालावर गाणे अमुचे जुळे !

कुरणावरती, झाडांखाली
ऊन-सावली विणते जाळी
येतो वारा पहा भरारा, गवत खुशीने डुले
टप् टप् पडती अंगावरती प्राजक्ताची फुले !

दूर दूर हे सूर वाहती
उन्हात पिवळ्या पहा नाहती
हसते धरती, फांदीवरती हा झोपाळा झुले
टप् टप् पडती अंगावरती प्राजक्ताची फुले !

गाणे असुचे झुळ झुळ वारा
गाणे असुचे लुक लुक तारा
पाउस, धारा, मोरपिसारा या गाण्यातुन फुले
टप् टप् पडती अंगावरती प्राजक्ताची फुले!

फुलांसारखे सर्व फुला रे
सुरात मिसळुनि सूर, चला रे
गाणे गाती तेच शहाणे बाकी सारे खुळे!
टप् टप् पडती अंगावरती प्राजक्ताची फुले
भिर् भिर् भिर् भिर् त्या तालावर गाणे असुचे जुळे!



## अभ्यास :

१. ऊन-सावली कशी जाळी विणते?
२. 'हसते धरती' असे का म्हटले आहे?
३. 'सूर पिवळ्या उन्हात नाहतात' असे कवी का म्हणतात?
४. हे संघगीत म्हणण्याचा सराव करा.

## २२. जेथे जातो तेथे

गेल्या शतकात न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे हे एक थोर पुरुष होऊन गेले. त्यांच्या पत्नीचे नाव होते रमाबाई. रमाबाईंनी न्यायमूर्ती रानडे यांच्या जीवनातील महत्त्वाचे प्रसंग एका पुस्तकात लिहून ठेवले आहेत. या पुस्तकाचे नाव आहे 'आमच्या आयुष्यातील काही आठवणी'.

एकदा न्या. रानडे रमाबाईंसह महाबळेश्वरला गेले होते. तेथून परतताना एक घाट लागतो. घाट चढताना घोड्यांना फार श्रम होऊ लागले; म्हणून न्या. रानडे गाडीतून खाली उतरले व पायी चालू लागले. रमाबाईही गाडीतून उतरून पायी चालू लागल्या. तेव्हा सखू आणि नानू ही त्यांची दोन्ही लहान मुलेही त्यांच्याबरोबर पायी चालण्याचा हट्ट करू लागली. त्यांची कशीबशी समजूत घालून, त्यांच्याबरोबर गड्याला बसवून, रमाबाई चालू लागल्या. पण तोपर्यंत न्या. रानडे चालत चालत दूरवर निघून गेले होते.

संध्याकाळची वेळ होती. प्रकाश मंद मंद होत होता. सोबतीला कोणीही नव्हते. सूर्य मावळू लागला होता. रमाबाई झपझप चालू लागल्या. त्यांच्यामध्ये आणि न्या. रानडे यांच्यामध्ये काही पावलांचे अंतर होते. न्या. रानडे तुकोबांचा एक गोड अभंग घोळून घोळून म्हणण्यात दंग होते. अभंग म्हणता म्हणताच ते झपझप चालत होते.

रमाबाई घाटाच्या माथ्यावर आल्या तोच त्यांना एकदम तेथील पुलाजवळ दोन मोठ्या विषारी इंगळ्या दिसल्या. एक एक इंगळी चांगली वीतभर लांब आणि चांगली जाडजूड होती. विषाने भरलेल्या त्यांच्या नांग्याच करंगळीइतक्या जाड दिसत होत्या. इंगळ्यांचा रंग काळसर गुळाच्या पाकासारखा दिसत होता. त्या दोन्ही इंगळ्या एकमेकींच्या मागे धावत चालल्या होत्या.

न्या. रानड्यांचे त्या इंगळ्यांकडे मुळीच लक्ष नव्हते. ते आपले तुकोबांचा एक अभंग आळवीत निघाले होते. इंगळ्यांवर त्यांचा पाय पडला तर काय

होईल या विचाराने रमाबाईंचा थरकाप झाला. त्या इंगळ्यांवर न्या. रानडे यांचे पाऊल पडण्यापूर्वीच आपण धावत जाऊन त्यांना बाजूला करावे, असा विचार त्यांच्या मनात चमकून गेला. त्या वेगाने धावत सुटल्या. 'वाटेत इंगळ्या आहेत, त्यांच्यावर पाय पडेल,' असे मोठ्याने ओरडून सांगावे असे त्यांना वाटले; पण भीतीने त्यांच्या तोंडून शब्द फुटेना.

न्या. रानडे अभंग म्हणत पुढेच चालले होते. इंगळ्या त्यांच्या अगदी जवळ आल्या होत्या. काय करावे हे रमाबाईंना सुचेना. आता त्यांचा पाय इंगळ्यांवर पडणार...त्या क्षणी रमाबाईंचे डोळे अचानक मिटले गेले. दुसऱ्या क्षणी त्यांनी डोळे उघडून पाहिले तोपर्यंत न्या. रानडे त्या इंगळ्या ओलांडून पुढे गेले होते.

संकट टळल्याबद्दल रमाबाईंनी देवाची करूणा भाकली. रमाबाई न्या. रानड्यांना म्हणाल्या, "आज किती मोठं संकट टळलं! तुमच्या पायाचा इंगळ्यांना नुसता स्पर्श झाला असता तर...अशा तिन्हीसांजच्या वेळी या आडरानात औषध मिळालं नसतं. कुणाची मदतसुद्धा मिळाली नसती." असे म्हणून त्या गहिवरल्या. त्यांना एकदम रडे कोसळले. त्यावर न्या. रानडे म्हणाले, "परमेश्वर सतत आपल्याजवळ असतो. तो पावलोपावली आपल्याला सांभाळीत असतोच. तुकोबांनीच म्हटले आहे ना?...

जेथे जातो तेथे, तू माझा सांगाती । चालविशी हाती धरूनिया ॥"

✤ ✤ ✤

अभ्यास :

१. न्यायमूर्ती रानडे व रमाबाई गाडीतून उतरून पायी का चालू लागल्या?
२. इंगळ्या पाहिल्यावर रमाबाईंच्या मनात कोणकोणते विचार आले?
३. न्यायमूर्ती रानडे रमाबाईंना काय म्हणाले?



## २३. प्राण गेले, इमान राहिले !

पानपतानजीक अब्दाली आणि मराठ्यांची गाठ पडली. मराठे पानपतावर थांबले. गाव पाठीशी घातले. भोवताली खंदक खणला. चहूबाजूंनी इब्राहिमखानाचा तोफखाना धडाडत होता.

तोफखाना धडाडत असताना अब्दाली पुढे येणे शक्य नव्हते. याच तोफखान्याच्या जोरावर भाऊसाहेब पेशव्यांनी उदगीरची लढाई जिंकली होती. इब्राहिमखान गारदी निजामाकडे होता; पण तेथील कटकटींना कंटाळून तो मराठ्यांकडे आला. मराठ्यांकडे युरोपीय पद्धतींचा तोफखाना आणि पलटणी नव्हत्या.

अत्यंत विश्वासाने सदाशिवराव भाऊसाहेब यांनी त्यास पलटण उभारण्यास सांगितले. तोफखानाही सज्ज करण्यास सांगितले. थोड्याच दिवसांत पलटण व तोफखानाही इब्राहिमखानाने तयार केला.

अहमदशहा अब्दालीला पेच पडला. इब्राहिमखानाचा तोफखाना बंद केला, तरच त्याला चढाई करणे शक्य होते. पण तोफखाना बंद कसा करणार ?

अब्दालीने विचार केला—इब्राहिमखान गारदी हा मुसलमान आहे. त्याची व आपली जात एक. त्याला मराठ्यांपासून फोडले तर? त्याला जहागीर द्यावी आणि आपल्या बाजूला वळवून घ्यावे.

तावडतोब त्याने आपल्या एका दूतास हाक मारली. त्याच्या हाती एक लखोटा दिला. त्यावर मोहोर ठोकली आणि त्याला इब्राहिमखानाकडे पाठवले.

इब्राहिमखानाची भेट घेणे काही सोपे नव्हते. त्यासाठी त्या दूताला बतावणी करावी लागली. आपण होळकरांकडून आलो आहोत, असे त्याने पहारेकऱ्यास खोटेच सांगितले.

त्या वेळी इब्राहिमखान आपल्या तंबूत होता. होळकरांकडून माणूस आला आहे, असे कळताच त्याने त्याला आत येऊ देण्यास सांगितले. दूत आला. त्याने अदबीने कुर्निसात केला. त्यावर इब्राहिमखानाने विचारले, "कोठून आलात ?"

"होळकरांकडून."

"होळकरांकडून ? पण त्यांच्याकडं तुम्हांला कधी पाहिल्याचं आठवत नाही."

"पण...म्हणजे..."

"अरे, पण पण काय ? कोणाकडून आलास ? खरं बोल ! तुझ्या हातात काय आहे ?"

"खरं म्हणजे...हा लखोटा..."

"आण तो इकडं."

इब्राहिमखानाने लखोटा घेतला. मोहोर पाहिली. लखोटा फोडला तो काय, आत कोरा कागद !

इब्राहिमखानाने जरबीने म्हटले, "याचा अर्थ ?"

"मी दुराणीकडून आलो आहे. त्यांचा निरोप..."

त्याला पुरते बोलूही न देता इब्राहिमखान म्हणाला, "काय आहे? मी फितूर व्हावं हाच ना?"

"शहानं सांगितलंय, की आपण एकाच जातीचे आहोत. या वेळी आपण आम्हांला येऊन मिळावं. जहागीर किताची पाहिजे तेवढा आकडा फक्त आपण घालावा..."

"अरे वा! मुलूख कुणाचा? देणार कोण? मुलूख आमचा आहे. आणि मी तुम्हांला येऊन मिळू? जा, तुझ्या शहाला सांग, मी निमकहराम नाही. हा इब्राहिमखान हलक्या मनाचा नाही. त्याचं दिल कच्चं नाही. प्राण गेला तरी मी माझं इमान सोडणार नाही. जा. जा. चालता हो इथून."

आणि त्याने त्या कागदाचे तुकडे तुकडे करून ते दूताच्या अंगावर भिरकावले. हिरमुसला होऊन दूत परत गेला.

पुढे पानपतच्या लढाईत याच इब्राहिमखानाने मोठी मर्दुमकी गाजवली. लढता लढता तो अखेर शत्रूच्या हाती सापडला. शत्रूने भयंकर हाल हाल करून त्याला ठार मारले. इब्राहिमखानाचे प्राण गेले; पण अखेरपर्यंत इमान राहिले!



**अभ्यास :**

१. अब्दालीने इब्राहिमखानाकडे कोरा कागद का पाठवला?

२. इब्राहिमखानाने दूतास कोणते उत्तर दिले? का?

३. खाली दिलेल्या शब्दांचे अर्थ समजावून घ्या :

मर्दुमकी, इमान, कुर्निसात, बतावणी, मोहोर, फितूर.

४. दूत आणि इब्राहिमखान यांच्यात झालेला संवाद वर्गात करून दाखवा.

# २४. शिवतीर्थ रायगड

'गड बहुत चखोट. दीड गाव उंच. महाराज बहुत संतुष्ट जहाले व बोलिले, तख्तास जागा हाच गड करावा!'

मुलांनो, हे वर्णन आहे रायगडाचे. आपल्या शिवाजीराजांचा रायगड!

कुठे आहे हा? हा आहे कोकणात. कुलाबा जिल्ह्यात. तिथे महाड नावाचे गाव आहे. तिथून उत्तरेस थोड्या अंतरावर हा किल्ला आहे. बहुत बाका.

बाका म्हणजे मजबूत. चारी अंगांना उंच उभ्या कड्यांची तटबंदी आहे. कित्येक शतके एखाद्या ढाण्या वाघासारखा रायगड तिथे उभा आहे.

किल्ला अतिशय अवघड. किल्ल्यावर जायला एकच वाट. दुसरी वाटच नाही मुळी. चहू अंगानी उभे ताशीव कडे. त्यामुळे कुठे तटबंदी बांधण्याची जरूरच नव्हती. एक मामुली दरवाजा. वर फक्त किल्लेदाराचा एक वाडा आणि बाकीच्या काही झोपड्या. झाले, संपले बांधकाम. यांहून अधिक इमारतींची तेव्हा कधी कुणाला गरजच वाटली नाही.



एके दिवशी मात्र या गडाचे भाग्य उजाडले. शिवाजी महाराजांनी हा किल्ला पाहिला. त्यांना तो फार फार आवडला. अगदी त्यांच्या मनी ठसला. त्यांनी तो जिंकून घ्यायचे ठरवले. तिथे आपल्या मराठी राज्याची राजधानी उभारायची, असा त्यांनी बेत केला. महाराजांनी किल्ला जिंकून घेतला. त्याचे पहिले नाव होते 'रायरी गड' ते बदलून त्यांनी त्याचे नाव ठेवले' रायगड.' राजांनी विचार केला, 'इथे राजधानी उभारायची तर आज असलेल्या इमारतींनी कसे काम भागेल ? नवे बांधकाम करावे लागेल.' त्यांनी हिरोजी इंदूलकरांना बोलावून गडाची फेररचना करायची आज्ञा केली.

हिरोजींनी लगेच गडावर नवनव्या इमारती बांधण्याचा सपाटा चालवला. पहिल्यांदा एक अतिशय भक्कम असा महादरवाजा बांधला. त्याच्या शेजारी दोन्ही बाजूंना दोन बुलंद बुरूज उभारले. काही नवे तट बांधले.

बालेकिल्ल्यात वेगवेगळ्या प्रकारच्या इमारती बांधल्या. प्रचंड राजसभा, तीन मजली नगारखाना, प्रधानांच्या कचेऱ्या, छत्रपतींचा खासा महाल, प्रधानांचे वाडे आणि बालेकिल्ल्याच्या जवळच गंगासागर तळेही बांधले.

नगारखान्याच्या डाव्या हातास बाजारपेठ उभारली. कशी अगदी एका दोरीत बांधलेली. अगदी एकसारखी अशी चव्वेचाळीस दुकाने. बावीस या बाजूला; बावीस त्या बाजूला. त्यांचे चौथरे किती उंच ? तर घोड्यावर बसून सामान खरेदी करता येईल इतके ! ही अशी नामांकित बाजारपेठ या सगळ्या देशभरातल्या कोणत्याच किल्ल्यावर उभारलेली नाही. यासारखी हीच !

त्याच वाटेने पुढे उजव्या हातास ब्राम्हणवाडा, पोतनीस–कारखानिसांची घरे आणि टोकावर जगदीश्वराचे प्रचंड देऊळ. उजव्या हातास, थोडे खाली दारूचे कोठार. दुसरे तसलेच कोठार, पश्चिमेस टकमक कड्याच्या अलीकडे.

टकमक कडा हे एक निमुळते होत गेलेले टोक. संपते तेथे एकदम खोल, खोल दरी ! खाली बघितले तर भोवंडच येईल !

सांगावे तरी किती ? हिरोजींनी शेकडो इमारती बांधून राजधानी उभारली.

अशा या गडावर शिवाजी महाराजांचा राज्याभिषेक झाला. स्वराज्य



स्थापण्याची त्यांची मनीषा सफल झाली.

आजही आपण रायगडावर गेलात तर महाराजांच्या समाधीचे दर्शन घडते.

✤ ✤ ✤

## अभ्यास :

१. रायगड किल्ला कोठे आहे ? तो पाहून शिवाजी महाराजांच्या मनात कोणते विचार आले ? २. रायगड जिंकल्यावर तेथे कोणकोणत्या नवीन इमारती बांधल्या ? का ? ३. चखोट, तख्त, बुलंद, बालेकिल्ला या शब्दांचे अर्थ माहीत करून घ्या. ४. खालील गटांत दिलेल्या शब्दांची योग्य जुळणी करा :

(अ) बुलंद दोन्ही बाजूंना शेजारी बुरूज उभारले दोन.

(आ) स्थापण्याची मनीषा सफल त्यांची झाली स्वराज्य.

(इ) घडते आजही समाधीचे महाराजांच्या दर्शन.



# २५. घास भरवताना





दीपका! मांडिले तुला सोनियाचे ताट
घडविला जडविला चंदनाचा पाट
घरदार प्रकाशाने भरी काठोकाठ
दारी आलेल्याची करू सोपी पायवाट.
घातली ताईने तुला रंगांची रांगोळी
पित्याने रेखिल्या गोड भविष्याच्या ओळी
घाशिली समई मी ही केली तेलवात
दह्यात हा कालविला जिरेसाळ भात.
गा रे राघू, गा गे मैने, बाळाच्या या ओळी
मुखी तुमच्याही घालू दुधातली पोळी;
कुतू, काऊ, चिऊ, माऊ या रे सारे या रे
सांडलेली शिते गोड उचलुनी घ्या रे.

गुणी माझा बाळ कसा मटामटा जेवी
आयुष्याने थोर करी माये! कुलदेवी!

मा/

**अभ्यास :**

१. या कवितेतील दीपक कोण? हे गाणे कोण म्हणते? कोणासाठी?
२. कुलदेवीला कोणती प्रार्थना केली आहे?

# २६. जत्रा

चैत्राचा महिना. झाडांना कोवळी पालवी फुटली होती. पाखरांचा किलबिलाट चालला होता. या दिवसांत शेतकरी रिकामा असतो. गव्हाचा व हरबऱ्याचा हंगाम संपलेला असतो. नांगरटीला अजून अवकाश असतो. शेतकऱ्याच्या हातात पैसे खुळखुळत असतात. या महिन्यात वेगवेगळ्या देवतांच्या जत्रा भरतात.

आज बहिरोबाची जत्रा. मी पहाटे उठलो व आंघोळ केली. आईने दशम्यांचा डबा भरून दिला. कपडे करून मी शाळेत गेलो. माझ्या वर्गातील मुले जमली होती. गुरुजी तयार होते. आम्ही जत्रेला जाण्यासाठी निघालो. बहिरोबाचे देऊळ आमच्या गावापासून फार लांब नव्हते. आम्ही झपाझप चालू लागलो.

दुरून देवळाचा कळस दिसू लागला. सनई-चौघड्याचे सूर कानांवर आले. उन्हाळ्यामुळे नदीचे पाणी उथळ होते. आम्ही हातपाय धुतले व देवळाकडे गेलो.

दरवाजाजवळ लोकांची खूपच गर्दी होती. जो तो आत शिरण्यासाठी धडपडत होता. गुरुजींनी त्यांना विनंती केली. पुरुषांनी एका रांगेत उभे राहावे, असे त्यांनी सांगितले. स्त्रियांची एक वेगळी रांग तयार झाली. आम्ही स्वयंसेवकाचे काम पत्करले. दोन मुले देवाजवळ उभी राहिली. दोघे जण दरवाजाजवळ थांबले. दोघे जण रांगेच्या शेवटी उभे राहिले. सर्वांना व्यवस्थित दर्शन मिळू लागले.

गावोगावचे शेतकरी बैलगाड्या जुंपून आले होते. जत्रा म्हणजे त्यांची सहलच. पुरुष, बायका व मुले यांच्या झुंडी लोटत होत्या. पागोटी, पटके व लुगडी यांमुळे गर्दी रंगीबेरंगी दिसत होती. दुपारी बारा वाजता आरतीचा सोहळा झाला. ढोल, कर्णे, चौघडा व घंटा यांच्या आवाजाने माझ्या कानठळ्या बसल्या.



नंतर आम्ही नदीवर गेलो. सर्वांच्या दशम्या एकत्र करून गुरुजींनी गोपाळकाला केला. हसत, गप्पागोष्टी करीत, आम्ही फराळ केला. पाणी पिऊन आम्ही हिंडायला निघालो.

कापडाची व तयार कपड्यांची दुकाने खूप होती. भांड्यांच्या दुकानांची रांगही मोठी होती. हलवायांची दुकाने तऱ्हेतऱ्हेच्या मिठायांनी गच्च भरलेली होती. फूलवाले व फळवाले पुढ्यात पाट्या घेऊन बसले होते. कासाराच्या दुकानापुढे बायकांची गर्दी जमली होती. फुगे, पिपाण्या व खेळणी विकणाऱ्या फेरीवाल्याच्या भोवती मुलांची गर्दी दिसत होती. जत्रेच्या दिवसांत हजारो रुपयांची उलाढाल होते, असे गुरुजींनी सांगितले.



या बाजूला एक दरवेशी अस्वलाचा खेळ करून दाखवत होता. त्या बाजूला एक माकडवाला दिसला. त्याची दोन माकडे नाचत होती. कोल्हाटयांच्या खेळाला खूप गर्दी जमली होती. एका कोल्हाटयाने आपल्या कपाळावर एक उंच बांबू उभा करून ठेवला होता. त्या बांबूवर एक मुलगी कसरतीचे खेळ करीत होती. पलीकडच्या बाजूला एक तंबू होता. जिकडे तिकडे उत्साह व आनंद भरला होता.

एका बाजूला लाकडी घोडयांचे एक रिंगण फिरत होते. पाचपाच पैसे देऊन आम्ही घोडयांवर बसून गिरक्या मारल्या. नंतर आम्ही फिरत्या पाळण्यात बसलो. उंचावरून एकदम खाली उतरण्याचा अनुभव आम्ही घेतला. खूप मजा वाटली.

नदीकाठच्या वाळूत कुस्त्यांची दंगल चालली होती. तीनचार कुस्त्या आम्ही पाहिल्या. एक कुस्ती तर अगदी अटीतटीची झाली. ती जिंकणाऱ्या पहिलवानाला चांदीचे कडे व पेला बक्षीस मिळाला.

सूर्य मावळतीच्या डोंगरावर टेकला. आम्ही परत फिरलो. आज खूप खूप पाहायला मिळाले. खूप खूप मजा आली.



## अभ्यास :

१. बहिरोबाची जत्रा कोणत्या महिन्यात भरली होती? शेतकऱ्यांना या महिन्यात जत्रेला जायला का सवड मिळते?
२. जत्रेत मुलांना कोणकोणत्या गोष्टी पाहायला मिळाल्या?
३. देवाचे दर्शन सगळ्यांना चांगले व्हावे म्हणून मुलांनी कोणती व्यवस्था केली?



# २७. सव्वीस जानेवारी

सव्वीस जानेवारी हा एक आपला राष्ट्रीय सण आहे. पूर्वी आपल्या देशावर इंग्रजांचे राज्य होते. त्यांची सत्ता नाहीशी व्हावी म्हणून आपण पुष्कळ प्रयत्न केले. सव्वीस जानेवारी १९३० रोजी स्वतंत्र होण्याची आपण प्रतिज्ञाही केली. त्यानंतर पंधरा ऑगस्ट १९४७ या दिवशी आपण स्वतंत्र झालो. इंग्रजांची आपल्यावरची सत्ता नाहीशी झाली.

आपण स्वतंत्र झालो; पण राज्य कोण चालवणार ?.आणि कसे चालवणार ? या गोष्टींचा आपल्या पुढाऱ्यांनी खूप विचार केला आणि या देशावर लोकांची सत्ता चालावी असे ठरवले. ही गोष्टही सव्वीस जानेवारीलाच १९५० मध्ये घडवून आणली. त्यामुळे आता हा दिवस चांगल्या जुन्या आठवणींचा व नव्या चांगल्या प्रतिज्ञेचा असा दुहेरी मंगल सण बनला आहे !

या दिवशी उजाडताच देशात सर्वत्र राष्ट्रध्वज फडकू लागतात. घराघरावर, सरकारी कार्यालयांवर व सार्वजनिक संस्थाच्या इमारतींवर भारतीय तिरंगा डौलाने फडकू लागतो.

नव–हिंद–राष्ट्र–झेंड्या
प्रणामा घे या ।।
हिंदभूमिच्या, हिंदि जनांच्या
स्वाभिमान–चिन्हा
प्रणामा घे या ।।

अशी भावना हृदयाहृदयांत उसळत असते.

देशातील अनेक संस्था ध्वजवंदनाचे कार्यक्रम योजतात. छात्रसेना, गृहरक्षक दल, पोलिस व लष्कर मोठ्या इतमामाने राष्ट्रध्वजाला वंदन करतात. त्यांच्या कार्यक्रमांची आखणी नेटकी केलेली असते. झेंडा हे राष्ट्राचे मानचिन्ह असल्याने त्याची प्राणपणाने जपणूक करतात. प्रत्येक राज्याच्या राजधानीत व आपल्या देशाची राजधानी असलेल्या दिल्लीत फार मोठा सोहळा असतो.

संध्याकाळी राज्यपाल व इतर अधिकारी नागरिकांसाठी स्वागत-समारंभ योजतात. रात्री रोषणाई केली जाते. मिरवणुकी निघतात. 'भारतमाता की जय ! प्रजासत्ताक भारत चिरायू होवो !' अशा घोषणांनी आकाश दुमदुमून जाते. मनोरंजनाचे अनेक सार्वजनिक कार्यक्रम असतात. मिरवणुकीत कल्पकतेने सजावट केलेली वाहनेही असतात. उत्कृष्ट सजावट करणारांना पारितोषिके दिली जातात.

राष्ट्रध्वजाच्या वंदनाने राजधानीतील कार्यक्रम सुरू होतो. राष्ट्रपती प्रजासत्ताक दिनाच्या निमित्ताने राष्ट्राला संदेश देतात. त्या दिवशी निघणारी मिरवणूक मोठी प्रेक्षणीय असते. या शिस्तबद्ध संचलनात सैन्यदले असतात, छात्रसेना असते. राज्याराज्यांतून आलेली भारतदर्शन घडविणारी सांस्कृतिक पथके तर फारच आकर्षक असतात. ही पथके

डोळ्यांसमोर जणू भारतच उभा करतात! ही रंगीबेरंगी पथके पाहून कोणाला आनंद वाटणार नाही?

या दिवशी आणखी एक खास कार्यक्रम असतो. तो भारतीय बालकल्याण समितीने योजलेला असतो. राज्याराज्यांतून छोटे पाहुणे त्यासाठी दिल्लीला आलेले असतात. हे पाहुणे छोटे, पण मोठे गाजलेले असतात! साहस आणि सेवा या बाबतींत त्यांनी पराक्रम केलेला असतो. कोणी बुडत्यांना वाचवलेले असते; तर कोणी आगीत होरपळणारांचा जीव वाचवलेला असतो. अशा कुमारांना आणि कुमारींना मुद्दाम राजधानीत बोलावण्यात येते. पंतप्रधान त्यांचे कौतुक करतात व त्यांना पारितोषिके देतात.

या दिवशी घरोघर गोडधोड करतात. एकमेकांचे शुभचिंतन केले जाते. आपल्या देशासाठी आपण काही तरी चांगले करावे, असे निश्चय केले जातात. सगळे लोक या राष्ट्रीय सणात मोठ्या उत्साहाने सामील होतात. सव्वीस जानेवारी हा एक आपला महत्त्वाचा राष्ट्रीय सण झाला आहे.



**अभ्यास :**

१. आपल्या देशात सव्वीस जानेवारीला कोणत्या महत्त्वाच्या गोष्टी घडल्या? २. या दिवशी आपण कोणकोणते कार्यक्रम करतो? ३. भारताच्या राजधानीत त्या दिवशी कोणकोणते कार्यक्रम होतात? ४. या दिवशी राजधानीत येणारे छोटे पाहुणे कोण? त्यांना तेथे त्या दिवशी का बोलावतात? अशा पाहुण्यांच्या गोष्टी तुम्ही वाचल्या आहेत. कोणत्या, ते सांगा. ५. सव्वीस जानेवारीला 'राष्ट्रीय सण' का म्हणतात?



# २८. गोगलगाय

बैसूनिया कशावरी
शंखोबाची निघे स्वारी !
गोगलगाय गोगलगाय
दोन शिंगे बिनापाय !
ऐटीमध्ये पाठीवरी
शंखोबाची बसे स्वारी !
चाल हिची मंद अशी
तीन वाव दर ताशी !
असा काही हिचा थाट
मागे चमचम करी वाट
अंग हिचे लोळागोळा
काय तरी अंगी कळा !
शंखोबाचे छत्र वर
तेच अस्त्र, तेच घर,
नाही पाय, नाही पंख
अकलेचा वरी शंख.

नका म्हणू रे टोचूनी
गोगलगाय माझी गुणी,
भयभीत जेव्हा होते
शंखामाजी ही दडते.
चतुर ही असे भारी
जीवालागी जपणारी
पीळ देऊनी पोटाला
निघे आपल्या कामाला.
हळू मार्ग आक्रमीत
गेली गेली, झाली गुप्त !
शोधा बघू, जा जा थेट
चमचमणारी वाट !
सापडेल तुम्हांलागी
चाललीसे निजमार्गी.
गोगलगाय पोटात पाय
म्हण खोटी नव्हे काय !



अभ्यास :

१. गोगलगाईच्या पाठीवर कोण बसलेले असते ? ती कशी चालते ?

२. गोगलगाईचे घर कोणते ?

३. 'गोगलगाय पोटात पाय' ही म्हण खोटी आहे, असे का म्हटले आहे ?

# २९. माणुसकीची ज्योत

'महाराज'या नावाने ओळखले जाणारे एक थोर पुरुष गुजरातेत आहेत. त्यांचे नाव रविशंकर शिवराम व्यास. गुजरातेत त्यांचे नाव सर्वांना माहीत आहे. सारे त्यांना मानतात.

गुजरातेत पाटणवाडिये या नावाची एक जमात आहे. चोऱ्यामाऱ्या करणे, दरोडे घालणे हाच या जमातीचा पूर्वी धंदा होता. चोऱ्या कराव्यात, तुरुंगात जावे, सुटून आल्यावर पुन्हा तेच करावे असे त्यांचे आयुष्य होऊन बसले होते.

सरकारने यावर हजेरीचा तोडगा काढला. स्त्रिया, मुले व पुरुष या सर्वांना रोज पोलिसचौकीवर जाऊन हजेरी द्यावी लागत असे. आपण चोऱ्या केल्या नाहीत, घरातच होतो, हे हजेरी देऊन त्यांना पटवून द्यावे लागे. हजेरी देण्यासाठी स्त्रियांनाही पोलिस चौकीवर जावे लागत असे, म्हणून पुरुषांना चीड येई. महाराजांना हे कळले, तेव्हा त्यांना फार वाईट वाटले. स्त्रियांना असे वागवणे महाराजांना खपले नाही. ते त्यांची हजेरी रद्द करण्याच्या प्रयत्नाला लागले.

संध्याकाळच्या वेळी वटोदराहून महाराज झपाट्याने चालले होते. मध्येच कोणीतरी म्हणाले, "महाराज, अशा तिन्हीसांजेच्या वेळी कुठं निघालात, एवढी घाई कसली?"

"मी जरा बडोद्याला चाललो आहे."

"आत्ता या वेळी बडोद्याला? आणि तेही चालत! अहो, पंचवीस कोसांची मजल आहे!"

"पण काय करणार? मला गेलंच पाहिजे. या लोकांची हजेरी रद्द करायची आहे ना? त्याबद्दलचे कागदपत्र मला आताच मिळाले; म्हणून उद्या लवकरात लवकर मला बडोद्याला पोचलं पाहिजे." एवढे बोलून महाराज झपाट्याने चालू लागले.



सारी रात्र चालून चालून महाराज बडोद्याला पोचले. तेथील अधिकाऱ्यांना भेटले. हजेरी रद्द करण्याचा हुकूम मिळवला आणि ते लगेच परत फिरले.

वाटेतच मध्यरात्र झाली. दिवस थंडीचे होते. त्यांच्या मनात विचार आला, 'आता कडाक्याची थंडी पडली आहे. असे थंडीत चालत राहण्या-

त्यांना लिहा–वाचायला शिकवले. साथीच्या रोगात रोग्यांची सेवाचाकरी केली. हाक आली तेथे तेथे ते धावून गेले.

लोकांची सेवा करण्यात ते आयुष्याचा क्षण न् क्षण वेचतात.

एकदा एका मुलाला कुत्रे चावले. जखम खूपच चिघळली. मुलाची तडफड त्यांना पाहावेना. त्याची काळजी कोणी घेतली नाही. दुखणे जिवावर बेतले. महाराजांना ते कळले मात्र; त्यांनी मुलाला आणि त्याच्या वडिलांना दवाखान्यात नेले. मुलाला तपासून डॉक्टर म्हणाले, "मुलाला काही दिवस इथंच ठेवलं पाहिजे." महाराजांना प्रश्न पडला—मुलाजवळ कोण राहाणार? ते त्याच्या वडिलांना म्हणाले, "तू राहा बाबा मुलाजवळ."

पण मुलाचा बाप म्हणाला, "नाही बाबूजी, मी कसा राहू? माझ्या शेताची सगळी कामं तुंबली आहेत. इथं बसून राहू आणि वर्षभर काय खाऊ?"

यावर महाराज काय बोलणार? महाराजांनी त्याची अडचण ओळखली आणि त्या मुलाची सेवा करण्यासाठी ते स्वतः त्या मुलाजवळ राहिले.

महाराजांनी आपले सगळे जिवन लोकसेवेलाच वाहिले आहे. त्यासाठी त्यांना खूपच त्रास भोगावा लागतो. पण तो सर्व ते आनंदाने सोसतात.

✤ ✤ ✤

**अभ्यास :**

१. हजेरीचा हुकूम रद्द झाल्यावर महाराजांनी लोकांना कसे वागायला सांगितले?
२. महाराजांना उपास का करावा लागत असे? ते उपास केव्हा सोडीत?
३. दवाखान्यातील प्रसंगावरून महाराजांच्या अंगचा कोणता गुण दिसतो?
४. गुन्हेगार जमातीच्या हितासाठी महाराजांनी कोणते प्रयत्न केले?
५. 'माणुसकीची ज्योत' असे नाव या पाठाला का दिले आहे?

ऐवजी येथेच कोठे तरी रात्र काढावी. सकाळ झाल्यावर उठून लगेच गावी जाऊ.' असा विचार करीत ते निघाले. किनखेळ नावाच्या एका गावाजवळ आले.

मध्यरात्रीची वेळ. त्या खेडेगावात या वेळी कोण जागे असणार? आणि झोपलेल्यांना उठवायचे तरी कसे? महाराज तसेच आपल्या ओळखीच्या घराजवळ गेले; पण त्यांनी कोणाला उठवले नाही. समोर गवताची एक गंज होती. तेथून थोडे गवत त्यांनी काढून घेतले. तेच अंथरूण म्हणून अंगणात टाकले आणि गवताच्या बिछान्यावरच त्यांनी अंग टाकले. थकलेला जीव. लगेच त्यांना झोप लागली. पहाट होताच ते उठले आणि झपाटयाने पुढे चालू लागले.

त्यांच्या प्रयत्नाने पाटणवाडिये जमातीची हजेरी रद्द झाली. मग त्यांनी साऱ्यांना बोलावून म्हटले, "पाहा रे बाबांनो! तुमची हजेरी आता रद्द झाली. आता चांगलं वागा. वाईट वागलात तर माझ्यावर ठपका येईल."

महाराजांवर या लोकांचे फार प्रेम होते. परंतु हाडीमासी खिळलेली त्यांची चोरीची सवय मधूनच डोके वर काढी. गुन्हा घडे. महाराज मग सर्वांना एकत्र जमवून म्हणत, "कोणी चोरी केली हे कबूल करा आणि शिक्षा भोगायला तयार व्हा; नाही तर मी उपास करीन."

कधी कधी त्यांची ही मात्रा लागू पडत नसे. मग महाराजांना उपास करावा लागे. एकएक दोनदोन दिवसच नाही तर कधी कधी आठआठ दहादहा दिवससुद्धा उपास करावा लागे. मग मात्र चोरी करणारा अपरात्री येऊन महाराजांचे पाय धरी, गुन्हा कबूल करी आणि महाराजांना उपास सोडण्यास सांगे. महाराजांना आनंद होई. ते त्याला चौकीवर नेत. गुन्हा केल्याबद्दलची त्याची शिक्षा सौम्य करण्याची खटपट करीत; पण गुन्हा केल्यास शिक्षा भोगली पाहिजे हे त्याला पटवीत.

रिकामपण हे गुन्ह्याचे मूळ आहे, ही गोष्ट सर्वांना महाराजांनी पटवून दिली. मोठा प्रयत्न करून या जमातीला त्यांनी जमिनी मिळवून दिल्या. बी-बियाणे देऊन शेती करायला लावले. दुष्काळात कामे मिळवून दिली.



# ३०. चणिया

चणिया तुमच्याच वयाचा आहे. तो गावात राहात नाही. दऱ्याखोऱ्यांतील गुहा हेच त्याचे घर. तो रानावनात रमतो. सडकादेखील त्याने पाहिलेल्या नाहीत. मग आगगाडी आणि मोटार यांची गोष्टच सोडा!

ज्या जंगलात तो राहतो, तेथील पाऊलवाटा त्याला बिनचूक माहीत आहेत. जंगलातील झाड न् झाड त्याच्या ओळखीचे आहे. तुम्ही त्याला विचारलेत, तर साऱ्या झाडांची नावे तो तुम्हांला पटापट सांगेल. कोणत्या झाडाला कोणते फळ येते, त्याचा रंग कसा असतो, ते गोड असते की आंबट असते, या साऱ्या साऱ्या गोष्टी चणियाला ठाऊक आहेत. जंगलात कोणत्या झाडावर कोणते पक्षी असतात, त्यांची घरटी कशी असतात, याचे

वर्णन तर तो फार बहारीने करतो. त्यांच्या कितीतरी गमती तो सांगतो. वेगवेगळ्या पक्ष्यांच्या आवाजांची नक्कल करावी तर ती चणियानेच !

रानावनात भटकणारे प्राणी हीच चणियाची दोस्तमंडळी. प्राण्यांच्या पावलांच्या ठशांवरूनही चणिया ते ठसे कोणत्या प्राण्यांचे असावेत, हे सहज सांगू शकतो. हत्ती, वाघ, अस्वल, गवा, रानडुक्कर, वनगाय असे कितीतरी प्राणी जंगलात असतात. त्या सर्वांची चणियाला बिनचूक माहिती आहे. जंगलातल्या सर्व प्राण्यांबद्दल चणियाला फार फार प्रेम वाटते. हेच प्राणी चवताळून कधी अंगावर आले तर त्यांच्यापासून त्याला आपला बचावही करता येतो.

चला तर ! आपण आता चणियाच्या घरात जाऊ या. हे घर कसले? ही तर गुहाच. गुहेत किती काळाकुट्ट अंधार आहे, पाहिलेत ? अगदी डोळ्यांत बोट घातले तरी दिसू नये असा. चणियाच्या या घरात सतत एक पणती तेवत असते. त्या पणतीच्या मिणमिणत्या प्रकाशातच चणियाच्या घरातील सारी कामे चालतात.

चणिया आपल्या वडिलांबरोबर शिकारीला देखील जातो. तो कोणत्याही प्रसंगी मुळीच घाबरत नाही. तो अत्यंत शूर आहे. नाही तरी दुबळ्या आणि भ्याड माणसाचा या जंगलच्या राज्यात टिकाव तरी कसा लागणार ? चणिया मासे धरण्यात पटाईत आहे. पळत्या हरणांची शिकार करण्यात तर त्याचा हातखंडा आहे. झाडावरचे मधाचे पोळे काढताना देखील त्याला मुळीच भीती वाटत नाही.

चणिया आणि त्याचे भाऊबंद शिकार करून कसेबसे आपले पोट भरतात. पण तेवढ्याने कसे भागणार ? ते डोंगराच्या उतरणीवरील जमीन तयार करतात. त्यांना नांगर आणि ट्रॅक्टर ठाऊक नाही. हातानेच ते जमीन खणतात. पावसाळ्यात भात लावतात. भाताचे कोंब दिसू लागले, की ते आपल्या शेताला काटेरी कुंपण घालतात. हरीण आणि रानडुक्कर यांच्यापासून या पिकाला फार जपावे लागते. रात्रंदिवस शेताची राखण करावी लागते.

मग भाताच्या लोंब्या दिसू लागतात. पक्ष्यांचे थवे आणि माकडांचे कळप यांच्यापासूनही या पिकाला फार जपावे लागते.

शेताची राखण करताना चणिया सफाईने गोफणगुंडा चालवतो. तरीही काही पक्षी आणि माकडे त्याची नजर चुकवून हळूच पिकात शिरतातच. पुरेसे पीक आले नाही तर कंदमुळे खाऊन चणिया आणि त्याचे भाऊबंद कसे तरी दिवस काढतात.

चणिया व त्याचे सारे भाऊबंद अत्यंत सरळ मनाचे आहेत. ते कधीही एकमेकांशी भांडत नाहीत. एकाचे सुख तेच साऱ्यांचे सुख आणि एकाचे दुःख तेच साऱ्यांचे दुःख. डोंगर, नद्या, दऱ्याखोरी, फुलेफळे, झाडीझुडी, पशू आणि पक्षी हेच त्यांचे साथीदार. जंगलातच ते लहानाचे मोठे होतात. जंगल हेच त्यांचे घर. जंगल हेच त्यांचे जग!



**अभ्यास :**

१. चणियाची दोस्तमंडळी कोणती त्याच्याविषयी चणियाला कोणकोणत्या गोष्टी माहीत आहेत? २ चणिया व त्याचे भाऊबंद आपले पोट भरण्यासाठी काय काय करतात? ३. चणियाचे कोणते विशेष गुण तुम्हांला आवडले? ४. तुमच्या गावानजीक जंगल असल्यास तेथील झाडाझुडपांची व फुलाफळांची माहिती मिळवा. शक्य तर पानांचे, फुलांचे संग्रहही तयार करा.



# ३१. अजिंठ्याची सहल

मुलांनो, चला, उतरा. आलं अजिंठा. आता आणखी जरा चढून गेलो, की तुम्हांला अजिंठ्याची लेणी पाहायला मिळतील. पाहिलीत ही गर्दी! परदेशाची काही मंडळीही लेणी पाहायला आली आहेत. लांबलांबचे लोक इथे येतात. चला, आता आपण लेण्यांकडेच जाऊ.

आता समोरच्या डोंगरदरीकडे पाहा. कशी अर्धचंद्रासारखी दिसते, नाही? या डोंगरदरीच्या पोटात तीस गुंफा आहेत. हीच अजिंठ्याची लेणी. ती पाहा, काही लेण्यांची तोंडं दिसायला लागली. थांबा. आधी थोडीशी माहिती घ्या; म्हणजे आपण काय पाहतो ते नेमकं तुम्हांला कळेल.

आत शिरलात, की काही गुंफांत तुम्हांला प्रशस्त लांबरुंद दालनं दिसतील. चारपाच मीटर त्यांची उंची. वर सपाट छत. दोन्ही बाजूंना

भव्य स्तंभ कोरलेले अन् नक्षीदार. प्रवेशद्वारावर अर्धवर्तुळाकृती गवाक्षे. गवाक्षे म्हणजे हवा व उजेड आत येण्यासाठी खिडक्या. चला, माझ्यामागून ओळीने या.

आत शिरताच गारगार वाटलं ना? उन्हातान्हातून प्रवास केल्याचा शिणोठा निघून गेला की नाही? लेण्यातली हवा अशीच नेहमी गारेगार असते.

आता समोर लक्ष द्या. केवढा प्रशस्त चौथरा आहे हा! आणि त्यावर कोण बसलं आहे सांगा बरं! भगवान गौतम बुद्ध.

बुद्ध ओळखण्याची खूण सांगतो. पद्मासन घालून बसलेला, डोळे अर्धवट मिटलेल्या कमळासारखे आणि नजर नाकाच्या शेंड्यावर खिळलेली. मुखावर करुणेचा भाव. कानाच्या पाळ्या लोंबत्या. जवळजवळ खांद्याला भिडलेल्या. मस्तकावर कुरळया केसांच्या जटा. एवढं लक्षात ठेवलंत, की तुम्हांला कोठेही गौतम बुद्ध ओळखता येईल.

इथल्या सगळ्या लेण्यांना नावं नाहीत. पण एकोणिसाव्या लेण्याला नाव आहे. त्याला म्हणतात गंधकुटी. हे लेणे तुम्ही सावकाशीनं पाहा. बराच वेळ लागेल. कारण ते आत, बाहेर व सगळीकडे कोरीव कामानं नटलं आहे. त्याच्यासमोर द्वारमंडप आहे. खांब सगळे वाटोळे. तो पाहा दुसरा बुद्ध. खाली नव्हे, वर दोन खांबांच्या कमानीत! इथे तो उभा आहे अन् त्यानं एक पायघोळ अंगरखा घातला आहे. त्याच्या चुण्या कशा अगदी स्पष्ट दिसतात. मुद्रासुद्धा किती शांत, किती गंभीर!

या गंधकुटी लेण्यात अन् सोळा व सत्रा या क्रमांकांच्या लेण्यांत चित्रांची भरभार आहे. जिकडे पाहाल तिकडे चित्रंच चित्रं. साधी एकरंगी नव्हेत, तर बहुरंगी! रंग तरी कसे, तर सौम्य अन् टिकाऊ! यांतली बहुतेक चित्रं बुद्ध आणि त्याचा धर्म या विषयींचीच आहेत; कारण बौद्ध धर्माच्या लोकांनीच ही लेणी खोदली आहेत. बौद्धांच्या काही मजेदार कथा आहेत. त्यांना जातककथा असं म्हणतात. बुद्धाने पूर्वी कोणत्या जातींत अन्



प्राण्यांच्या रूपात जन्म घेतले, यांच्या त्या कथा आहेत. त्यांपैकी कित्येक कथा या लेण्यांत चित्रित केल्या आहेत.

सोळाव्या लेण्यातली सगळी चित्रं बुद्धाच्या शेवटच्या जन्मातली आहेत.

मुलांनो, तुम्ही ती ओळीनं पाहात चला. हे मायावतीला म्हणजे बुद्धाच्या आईला पडलेलं स्वप्न! बुद्ध जन्माला आल्याचा तो पुढचा देखावा. अन् ही पुढल्या चित्रातली गंमत बघितलीत? पाच वर्षांचा गौतम बुद्ध धूळपाटीवर बोटानं अक्षरं गिरवीत आहे. पूर्वी पाट्या नव्हत्या अन् दगडी पेन्सिलीही नव्हत्या. अशा धूळपाटीवर बोटं झरेतो अक्षरं गिरवावी लागत. असं शेवटपर्यंत पाहात गेलात तर सगळं बुद्धाचं चरित्रच इथं चित्रांकित झालेलं दिसेल.

ही तीस लेणी किती जुनी, किती प्राचीन आहेत सांगू! सुमारे दोन हजार वर्षांची! आपण ही सगळी लेणी तीन-चार तासांत पाहून मोकळे होतो. पण ती सगळी कोरायला किती वर्षे लागली, ठाऊक आहे? सुमारे आठशे! ऐकून छाती दडपली ना? अशी अनेक अद्भुत आश्चर्ये आपल्या भारतात आहेत. तुम्ही मोठेपणी ती पाहा अन् धन्य व्हा!







✤ ✤ ✤

### अभ्यास :

१. अजिंठा कोठे आहे? त्याची कशाविषयी प्रसिद्धी आहे?
२. अजिंठ्याच्या गुंफांबद्दल कोणकोणती माहिती दिली आहे?
३. भगवान बुद्धाची मूर्ती कशी ओळखावी?
४. सोळाव्या लेण्यात बुद्धाची कोणकोणती चित्रे आहेत?
५. अजिंठ्याच्या लेण्यांस भारतातील एक अद्भुत आश्चर्य असे का म्हणतात?



# ३२. गाई गाई

आली बघ गाई गाई
　　　शेजारच्या अंगणात,
फुललासे निशिगंध,
　　　घोटाळली ताटव्यात !

आली बघ गाई गाई
　　　चांदण्याचे पायी चाळ,
लाविले का अवधान
　　　ऐकावया त्यांचा ताल !

आली बघ गाई गाई
　　　लोचनांचे घेई पापे,
म्हणून का भारावले
　　　डोळे माझ्या लाडकीचे !



आली बघ गाई गाई
        लावी करांगुली गाली
म्हणून का हासलीस ?
        उमटली गोड खळी !

आली बघ गाई गाई
        काढीतसे लांब झोका,
दमलीस खेळूनिया
        झाक मोतियांच्या शिंपा !

✤ ✤ ✤

ताटवा–फुलझाडांची रांग. अवधान–लक्ष. लोचन–डोळा.

**अभ्यास :**

१. हे गाणे कोण म्हणत आहे ? कशासाठी ? २. मुलीला कशामुळे झोप येत नसावी, असे आईला वाटते ? ३. मुलीला कोणी हसवले ? कसे ?

# ३३. द्रोणशिष्य एकलव्य

घनदाट अरण्यातून वाट काढीत ती सारी मुले निघाली होती. ती मुले म्हणजे कौरव-पांडव राजपुत्र. भीम-अर्जुन, दुर्योधन-दुःशासन सगळे गुरू द्रोणाचार्यांच्या हाताखाली शस्त्रविद्या शिकणारे विद्यार्थी. सगळेच द्रोणाचार्यांचे शिष्य. त्यांच्याबरोबर एक कुत्राही होता. तो जोरजोराने भुंकत होता. इतक्यात सरसर बाण येऊन त्याचे तोंड त्या बाणांनी जखडले गेले. त्याचे भुंकणे बंद झाले. हे पाहून त्या सगळ्यांनाच आश्चर्य वाटले. बाण कोणी मारले हे पाहण्यासाठी ते पुढे निघाले. एका प्रशस्त मोकळ्या जागी येऊन ते सर्व थांबले.

लांबवर एक झोपडी दिसत होती. झोपडीपाशी कसला तरी मोठा



थोरला पुतळा असावा असे वाटत होते. त्याच्या अलीकडे कोणी तरी धनुष्य-बाण घेऊन उभा होता. तो तेथीलच रहिवासी असावा; पण पाठमोरा असल्यामुळे त्याचा चेहरा दिसत नव्हता. आपल्या कुत्र्याची अशी अवस्था करणारा हाच तो मुलगा असावा, असे त्यांना वाटले. त्याला जाब विचारण्यासाठी त्यांतील काही मुले पुढे सरसावली. इतक्यात त्यांचे गुरुजी द्रोणाचार्य तेथे येऊन पोहोचले. गुरुजींनी त्यांना तेथेच थांबवून म्हटले, "अरे, समोर काय घडतं ते तर पाहा!"

सारी मुले स्तब्ध उभी राहून तो मुलगा काय करतो, ते पाहू लागली. त्याने सर-सर-सर बाण सोडले. भराभर बाणांचा पूल उभा केला. हां हां म्हणता तो आकाशाला जाऊन भिडला आणि नंतर एकाच बाणाने त्या धनुर्धर मुलाने तो मोडून पण टाकला!

मुलांच्या आश्चर्याला पारावार उरला नाही. हा विलक्षण धनुर्धर कोण हे जाणून घ्यायला मुले उतावीळ झाली होती. ती पुढे होणार इतक्यात त्यांच्या कानांवर शब्द पडले!

"गुरुजी, मी तुमच्या पायांवर ही फुलं वाहतो."

त्या धनुर्धारी मुलाने भात्यातून एक बाण काढला. तो धनुष्यावर चढवला आणि दोरी अशा कौशल्याने ओढली, की बाणाने रानवेलीवरचा फुलांचा गुच्छ तोडून नेमका समोरच्या पुतळ्याच्या पायांवर नेऊन टाकला!

बाणांनी कुत्र्याचे तोंड बंद करणारा हाच तो धनुर्धर! अशी साऱ्यांची खात्री होऊन चुकली.

मुले जवळ येऊन उभी राहिली होती; पण त्या धनुर्धारी मुलाला त्याचा पत्ताही नव्हता! एकाग्रतेने त्याचे पाठ गिरवणे चालूच होते. गुरुजींना त्याच्या त्या एकाग्रतेचे मोठे कौतुक वाटले.

आता गुरू द्रोणाचार्यांनाही राहवेना. तेच स्वतः पुढे झाले. मागोमाग मुलेही निघाली. गुरुजींनी कौतुकाने त्या मुलाच्या पाठीवर हात ठेवला आणि प्रेमाने विचारले, "बाळ, तू कोण?"



"मी ? ...मी द्रोणशिष्य एकलव्य !"

"काय ? तू द्रोणाचार्यांचा शिष्य ?" अर्जुनाला आश्चर्याचा धक्काच बसला.

"पण गुरुजी तर राजधानीत असतात. मग तुला या अरण्यात येऊन ते कसं शिकवणार ?" भीमाने कुतुहलाने प्रश्न केला.

समोरच्या पुतळ्याकडे बोट करून एकलव्य म्हणाला, "ते पाहा माझे गुरुजी !"

त्या झोपडीपाशी मातीचा एक ओबडधोबड पुतळा होता. तो द्रोणाचार्यांचा होता. त्या पुतळ्यालाच गुरू मानून एकलव्य विद्या शिकत होता.

"छट्, मातीचा पुतळा काय विद्या शिकवतो काय ?" कौरवांपैकी कोणी तरी शंका काढली.

"का नाही शिकवणार ? मी तर याला मातीचा पुतळा समजतच नाही. प्रत्यक्ष द्रोणाचार्यच इथं येऊन बसलेले आहेत व तेच मला शिकवत आहेत, या भावनेनंच मी ही विद्या शिकतो."

"पण हे कसं शक्य आहे ?" पुन्हा कोणी तरी विचारलेच

"मी सांगतो," गुरू द्रोण मध्येच म्हणाले, "आता मला सारं आठवलं. काही वर्षांपूर्वी माझ्याकडं एक भिल्ल मुलगा आला होता खरा. हिरण्यधनू या अरण्यवासी राजाचा तो पुत्र. त्या वेळी मी त्याला प्रत्यक्ष विद्यादान करू शकलो नाही; मात्र त्याची विद्या शिकण्याची तळमळ पाहून मनापासून आशीर्वाद मी दिला होता."

एकलव्याने गुरू द्रोणाचार्यांना आदराने वंदन केले. त्याचे डोळे आनंदाश्रूंनी भरून आले. त्याचा कंठ दाटून आला. तो म्हणाला, "गुरुवर्य, केवळ आपल्या आशीर्वादानंच मला ही विद्या लाभली. आपला आशीर्वाद सदैव माझ्या पाठीशी असावा."

द्रोणाचार्य झटकन् पुढे झाले. त्यांनी एकलव्याला प्रेमाने आपल्या छातीशी धरले. ते म्हणाले, "धन्य एकलव्या! शिष्य असावा तर तुझ्यासारखा!"

❖ ❖ ❖

**अभ्यास :**

१. धनुर्विद्या म्हणजे कोणती विद्या ? एकलव्याने या विद्येतील आपली कोणती कौशल्ये दाखवली ?

२. एकलव्याने धनुर्विद्या कोणाकडून मिळवली ? कोणत्या पद्धतीने ?

३. 'शिष्य असावा तर तुझ्यासारखा!' असे द्रोणाचार्य का म्हणाले ?

४. धनुर्धर, शस्त्रविद्या, एकाग्रता या शब्दांचे अर्थ समजावून घ्या.



# ३४. साखरेची कहाणी

सकाळ होताच चंदू उठला. त्याने दात घासले. तोंड धुतले. आईने त्याला दुधाचा पेला भरून दिला. चंदूने दुधाचा पहिला घोट घेतला मात्र, तो आईला म्हणाला, "हे काय ग आई, दुधात मुळी साखरच नाही!"

आईने साखरेचा डबा त्याच्यापुढे ठेवला. साखर घेण्यासाठी चंदूने चमचा डब्यात घातला. तोच काय आश्चर्य! साखर बोलू लागली—

"चंदू, अरे, रोज माझी एवढी आठवण काढतोस; पण माझी विचारपूस कधी केलीस का तू? मी जन्मले कशी? तुझ्याजवळ येते कशी? आहे का तुला माहीत?"

चंदू म्हणाला, "नाही ग बाई नाही. सांग तर मला तुझी कहाणी."

"सांगते हं...ऐक नीट...

"माझं मूळ घराणं म्हणजे ऊस. तुम्हां लोकांची जशी निरनिराळी गोत्रं असतात ना? तशाच उसाच्याही पुष्कळ जाती आहेत. पण त्या काही आता मी तुला सांगत नाही.

"ऊस तयार झाला म्हणजे मग तो तोडून कारखान्याकडं आणतात. मग तो गव्हाणीत टाकतात. गव्हाणी म्हणजे सरकता लोखंडी पट्टा. तेथून तो



ऊस यंत्राच्या मदतीनं चरकाकडं जातो. तेथे त्याचे बारीक तुकडे होतात. चार-पाच चरकांतून पिळून पिळून उसाचा रस काढतात. त्या रसाचं वजन करतात. मग तो सगळा रस गरम करतात. त्यात



पुष्कळ घाण असते. ती काढून टाकण्यासाठी चुनकळी, गंधक अशी औषधं वापरतात. रस शुद्ध केल्यावर तो पुन्हा उकळतात. मग हा रस मोठ्या टाकीत गोळा करतात. या टाकीत रसातील सगळी मळी, पाण्यातील गाळ खाली बसतो ना, तशी खाली बसते. मग



शुद्ध रस बाहेर येतो. हा रस खूप खूप उकळतात. तो खूप उकळला, की त्याची काकवी तयार होते. या काकवीलाही गंधकाचा वास देऊन शुद्ध करतात. ही काकवी पुन्हा उकळली, की तिचे असंख्य लहान मोठे दाणे तयार होतात. हेच माझं पहिलं रूप! पण या वेळी मी



बरीच मळकट दिसते. मला स्वच्छ करण्यासाठी पुन्हा माझ्यातली मळी काढतात. मग मी कशी पांढरीशुभ्र दिसते. अगदी आता तुझ्यासमोर आहे तशी !

"कधी मी बारीक असते; तर

कधी जाड. मी बारीक-जाड अशा स्वरूपांत तयार होते. मग माझ्या आकाराप्रमाणे मला वेगवेगळ्या पोत्यांत भरतात.

"चंदू, मला जिभेवर ठेवलं, की तुझं तोंड किती गोड होतं! अरे, तुझंच काय, मी मुळी सगळ्यांचंच तोंड गोड करते! म्हणून तर 'तोंडात साखर पडो' असं सगळे म्हणतात! तुम्हांला जशी मी आवडते तशी मोठ्यांना पण आवडते. तुम्ही दूध पिता त्या वेळी हटकून तुम्हांला माझी आठवण होते. सणासुदीला माझ्यामुळंच तुम्हांला गोडधोड खायला मिळतं! तुम्हांला आवडणाऱ्या चॉकलेट आणि गोळ्यांमध्ये मी असतेच. इतकंच काय, तुम्ही आंबा, पेरू, चिक्कू, केळी ही फळं खाता ना? त्यांतही मी उसातल्यासारखी दडून बसलेली असते; दिसत मात्र नाही."

साखरेची कहाणी संपली. चंदूने दुधाचा पेला तोंडास लावला. त्या दुधाची गोडी चाखत चाखत तो म्हणाला, "खरंच, साखर गोड तशीच तिची कहाणीही गोड!"



❖ ❖ ❖

**अभ्यास :**

१. साखर कशापासून तयार करतात? ती कोठे तयार होते?

२. साखर तयार करताना क्रमवार कोणकोणत्या गोष्टी कराव्या लागतात?

३. उसाशिवाय आणखी कोणकोणत्या गोष्टींत साखर आढळून येते?

४. जवळपास साखर-कारखाना असल्यास तेथे सहल काढा.

बा भा ३/९



# ३५. भरतभेट

(अयोध्येतील राजवाडा. सिंहासनावर श्रीरामाच्या पादुका. भरत त्यांची पूजा करीत आहे. पूजा संपली. भरत साष्टांग नमस्कार घालतो. मग उठून, गुडघे टेकून, हात जोडून तो बोलू लागतो.)

भरत : पादुकांनो, दादांची तुम्हांला आठवण होत नाही? (थांबून) असं कसं होईल? त्यांच्या पावलांचा पवित्र स्पर्श तुम्हांला आठवत असेल. बोलता येत नाही, म्हणून तुम्ही आपलं दुःख मुकाट्यानं

सोसता. पण मी ते कसं सहन करू? वनवास संपवून दादा अजून परत कसे आले नाहीत, या विचारानं रात्रभर माझा डोळ्याला डोळा लागत नाही. (गळा दाटून येऊन) डोळ्यांत प्राण आणून किती दिवस वाट पाहू मी तुमची दादा?

(त्याच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागतात. त्याला पुढे बोलवत नाही. इतक्यात एक सेवक पाऊल न वाजवता आत येतो. भरताजवळ येऊन हात जोडून उभा राहतो.)

सेवक : (वाकून हळूच) महाराज, (थांबून, थोड्या मोठ्या आवाजात) महाराज, (तरीही भरत वळून पाहात नाही; म्हणून अधिक मोठ्याने) महाराज बाहेर आले आहेत...

भरत : (त्याचे शब्द ऐकून लगबगीने उठत आणि त्याच्याकडे वळून पाहात) महाराज बाहेर आले आहेत? दादा आले? प्रभू रामचंद्र अयोध्येला परत आले? मग तुम्ही सारे स्वस्थ कसे? नगरात दवंडी पिटवा, मंगल वाद्ये वाजवा, स्वागताच्या तयारीला लागा.

सेवक : (खाली मान घालून) बाहेर प्रभू रामचंद्र आलेले नाहीत महाराज.

भरत : मग कोण आलं आहे?

सेवक : एक म्हातारबुवा ठाण मांडून बसले आहेत! मोठे खाष्ट दिसतात. आत्ताच्या आत्ता आपली भेट व्हायला हवी, असा हट्ट आहे त्यांचा!

भरत : बिचारा कुणी तरी दुःखी जीव असेल! (सेवकाला) जा, पाठवून दे त्यांना आत. (सेवक जातो. पादुकांकडे वळून भरत बोलू लागतो.) दादा, तुमच्या पादुका सिंहासनावर ठेवून चौदा वर्षं तुमच्या नावानं मी राज्यकारभार चालवला. आता हा भार मला सहन होत नाही. आज तुमचं येणं घडलं नाही तर...

(एक वृद्ध गृहस्थ खोकत खोकत आत येतो. भरत वळून त्याच्याकडे पाहतो. म्हातारा वाकून त्याला नमस्कार करू लागतो. भरत पुढे होतो आणि त्याचे हात धरून बोलू लागतो.)

भरत : आजोबा, लहानांना वडील माणसांचा आशीर्वाद हवा असतो.

म्हातारा : (खोकत) तो द्यायलाच मी आलो आहे, भरतराज.

भरत : (आश्चर्याने) इतका त्रास घेऊन तुम्ही मला भेटायला आलात; तेव्हा तुमच्यावर काहीतरी मोठा अन्याय झाला असावा, असं मला वाटतं.

म्हातारा : अन्याय झाला आहे; पण तो माझ्यावर नाही !

भरत : मग कुणावर ?

म्हातारा : आपल्यावर ! भरतराज आपल्यावर !

भरत : (मोठ्या आश्चर्याने) माझ्यावर ?

म्हातारा : हो, आपल्यावर ! आपल्या डोक्यावरल्या या जटा, अंगावरलं हे जाडंभरडं वस्त्र, आपलं रोड शरीर, या साऱ्या गोष्टी काय राजाला शोभतात ?

भरत : (गोंधळून) तुम्ही काय म्हणताय तेच मला कळत नाही.

म्हातारा : हे पाहा, श्रीरामांच्या वनवासाची चौदा वर्षं केव्हाच संपून गेली. आपण काय जन्मभर त्यांची वाट पाहात बसणार आहात ? ते केव्हा येतील कोण जाणे ! कदाचित रानावनात राक्षसांनी त्यांचा चट्टामट्टासुद्धा करून...

भरत : (मध्येच रागाने) एक शब्द बोलू नका पुढं ! तुमच्या वयाकडं पाहून मी गप्प बसतो. दुसरा कुणी असं बोलला असता, तर त्याची जीभ कापून हातावर ठेवली असती !

म्हातारा : असं रागावू नका महाराज. तुमच्या हिताची गोष्ट सांगायला

आलोय मी! चौदा वर्ष तुम्ही राज्य मोठं चांगलं केलं. 'राजा असावा तर भरतासारखा,' हे शब्द जिथं जावं तिथं कानांवर पडतात.

भरत : हे रामराज्य आहे, भरताचं राज्य नाही! भरत या राज्याचा सेवक आहे.

म्हातारा : हे नाही बुवा आपल्याला पटत! आता सिंहासनावर बसण्याचा अधिकार आपलाच आहे.

भरत : (म्हाताऱ्याची समजूत घालणे अशक्य आहे, हे ओळखून हसत) माझाही तोच विचार चाललाय.

म्हातारा : (आश्चर्याने) म्हणजे! तुम्ही सिंहासनावर बसणार? केव्हा?

भरत : आज.

म्हातारा : (गोंधळून) पण नगरात तर तशी तयारी कुठंच दिसत नाही.

भरत : (हसून) माझं सिंहासन निराळं आहे! तुम्हांला पाहायचंय ते? (म्हातारा मानेने 'हो' म्हणतो.) मग चला माझ्याबरोबर.

(२)

(अयोध्येजवळ असलेल्या नंदिग्रामातील भरताचा आश्रम. भरत त्या वृद्धाला घेऊन येतो.)

म्हातारा : (इकडे तिकडे पाहून) हा तर कुणा ऋषींचा आश्रम दिसतोय!

भरत : (हसून) छे! हा माझा राजवाडा आहे, आजोबा.

म्हातारा : इथं कसलं सिंहासन दाखवणार आहात आपण मला? (मोठ्याने हसत) हरणाचं कातडं हेच इथलं सिंहासन!

भरत : माझं सिंहासन आश्रमाच्या मागच्या बाजूला आहे.
(दोघेही चालत मागच्या बाजूला येतात. तेथे नदीकाठी लाकडाने भरलेले एक मोठे अग्निकुंड दिसते.)



भरत : (अग्निकुंडाकडे बोट दाखवून) आजोबा, हे भरताचं सिंहासन.

म्हातारा : (आश्चर्याने) म्हणजे ?

भरत : चौदा वर्षांपूर्वी दादांना अयोध्येला परत आणण्यासाठी मी गेलो होतो; पण ते आले नाहीत. त्यांच्या पादुका सिंहासनावर ठेवून मी राज्य चालवावं अशी आज्ञा त्यांनी मला केली. 'मात्र चौदा वर्षं संपताच मी अयोध्येला परत येईन', असं वचन त्यांनी मला दिलं. 'तुम्ही तसे परत आला नाही, तर मी अग्निप्रवेश करीन' असं तेव्हा मी त्यांना सांगितलं होतं. आज सूर्य मावळेपर्यंत मी दादांची वाट पाहणार आहे. ते आले नाहीत तर मी या अग्निकुंडात...

म्हातारा : छे! छे! असं कुठं झालंय का कधी ?

भरत : पूर्वी कधी झालं नसलं तरी आज संध्याकाळी होईल.

(म्हाताऱ्याकडे पाहात) तुम्हांला खरं वाटत नाही हे? जरा थांबा. (अग्निकुंडाकडे जात, मोठ्याने) तुम्हीच सेवकांना विचारा. कोण आहे रे तिकडं?

(भरत मागे वळून पाहतो पण तो वृद्ध कोठे दिसत नाही. त्याच्या जागी एक धिप्पाड वानर उभा आहे. तो पुढे येतो व वाकून भरताला नमस्कार करतो.)

मारुती : भरतराज, मी प्रभू रामचंद्रांचा सेवक–मारुती. इतका वेळ म्हाताऱ्याचं सोंग घेऊन मी आपल्याला फसवलं. क्षमा करा मला. आपल्याला सिंहासनावर बसायचं आहे का, हे प्रभू रामचंद्रांना जाणून घ्यायचं होतं. तसं असतं तर त्यांना राज्य करायचं नव्हतं. केवळ हे कळावं म्हणून मला हे सोंग करावं लागलं.

भरत : (आनंदाने) दादा कुठं आहेत? माझे दादा कुठं आहेत?

मारुती : रावणाचा वध करून श्रीराम विमानानं इकडं यायला निघाले आहेत. थोडयाच वेळात ते इथं येऊन पोचतील.

भरत : (मारुतीला मिठी मारून) आज दादा अयोध्येला परत येणार! मारुतीराया, केवढी आनंदाची वार्ता घेऊन तुम्ही आला. चला, लवकर चला. दादांच्या स्वागतासाठी सारी अयोध्या सज्ज होऊ दे.

(नगराबाहेरची जागा. नगारे वाजत आहेत. मधूनच मंगल वाद्यांचे सूर ऐकू येत आहेत. सारी अयोध्या श्रीरामाच्या स्वागतासाठी लोटली आहे. अगदी पुढे (पादुका घेऊन) भरत व मारुती, त्यांच्या मागे वसिष्ठ, राजमाता, मंत्री व त्यांच्यामागे चोहोकडे पसरलेला लोकांचा समुद्र.)

भरत : मारुतीराया, अजून कसं दादांचं विमान येत नाही?



मारुती : (निरखून पाहात आणि बोट दाखवत) ते पाहा. ते पाहा. (विमान दिसू लागते.)

भरत : (आनंदाने उचंबळून येऊन) दादा आले! दादा आले!
(लोकांमध्ये 'प्रभू रामचंद्र आले, प्रभू रामचंद्र आले' अशी कुजबूज. विमान उतरते. भरत धावत पुढे जातो. श्रीराम विमानातून बाहेर येतात.)

भरत : दादा! दादा! (आनंदाने गळा दाटून येऊन त्याला बोलवत नाही.)

श्रीराम : भरता, वत्सा भरता....

भरत : (श्रीरामाच्या पायांवर डोके ठेवून) दादा, मी स्वप्नात तर नाही ना? दादा, तुम्ही खरंच आला आहात ना!

**श्रीराम** :(त्याला उठवून पोटाशी धरत आणि त्याच्या पाठीवरून मायेने हात फिरवत) **माझ्या काळजीनं किती वाळून गेला आहेस रे तू! वनवासाला गेलो मी ; पण त्याचे कष्ट मात्र तू भोगलेस.**

भरत :**दादा, या तुमच्या पादुका. चौदा वर्षं तुमची ही ठेव मी सांभाळली. आता तुमची तुम्ही ती परत घ्या.** (श्रीरामाच्या पायांत पादुका घालतो.)

**श्रीराम** :(त्याला उठवून) **भरता, माझ्यापेक्षाही तू मोठा वीर आहेस. तुझं हे बंधुप्रेम पाहून सारं जग नेहमी म्हणत राहील, 'भाऊ असावा तर भरतासारखा!'**

(लोकांतून गर्जना–

'प्रभू रामचंद्र महाराज की जय!'

'भरतराज की जय!')



❖ ❖ ❖

**अभ्यास :**

१ म्हातारा कोण होता? तो तिथे का आला होता?

२. भरताचे निराळे सिंहासन कोणते?

३. भरताने रामाच्या पादुका कोठे ठेवल्या होत्या? का?

४. 'भाऊ असावा तर भरतासारखा' असे का म्हटले आहे?





# ३६. भारतमाता

प्रियतम अमुची भारतमाता
आम्ही सारी तिची मुले
रंग वेगळे, गंध वेगळे
तरी येथली सर्व फुले!

प्रिय आम्हांला येथिल माती
प्रिय हे पाणी झुळझुळते
प्रियकर ही डुलणारी शेते
प्रिय हे वारे सळसळते.

प्रियतम अमुचा धवल हिमाचल
बघे भिडाया जो गगना
प्रियतम अमुचे सह्यविंध्य हे
प्रियतम या गंगा-यमुना.

मानव सारे समान असती
शिकवण ही जगतास दिली !
या मातेची मुले सद्‌गुणी
सर्व जगाला प्रिय झाली !

प्रियतम अमुची भारतमाता
वंदन आम्ही तिला करू
या मातेची मुलें लाडकी
सदा तिचा ध्वज उंच धरू !







**अभ्यास :**

१. आपल्याला प्रिय वाटणाऱ्या कोणत्या गोष्टी या कवितेत सांगितल्या आहेत ?
२. मुले कोणासारखी आहेत, असे म्हटले आहे ?
३. भारतमातेच्या सद्‌गुणी मुलांनी जगाला कोणती शिकवण दिली ? त्यांची काही नावे सांगा.
४. 'झंडा उंचा रहे हमारा' हे ध्वजगीत मिळवा आणि पाठ करा.



# ३७. बाळराज

आकाशात तारे
संगीत गाणी गाती

त्यांचे ओठ का हालती
तान्हेबाळा

काजवे फुलले फुलले लाखलाख
पहाया श्रीमुख राजसाचे

थुई थुई उडे का ग कारंजे उसळे
तुझ्यामुळे उचंबळे तान्हेबाळा

पाखरे उडती फुलतात फुले
उठतात मुंले उजाडत

पेरा झाला रानातून मोड काढी वर मान
तसं हसे माझं तान्हं पाळण्यात

तान्हियाचे दात जशा मोतियांच्या ओळी
हासता पडे खळी गोड गाली

माळ्याला ताकीद येसबंदाच्या रोपाची
तान्ह्याला झाली दृष्ट सभेमधल्या लोकांची

आंथरुण केले जाई मोगऱ्याचे
सख्या गोजिऱ्याचे अंग मऊ

शाळेच्या पंतोजींना देऊ करावी खारीक
बाळ लिहाया शिकूं दे नीट अक्षर बारीक

हाती दूधभात वर पेरते साखर
तुझे जेवण प्रकार तान्हेबाळा

❖ ❖ ❖

येसबंदाचे रोप : दृष्ट काढायची एकप्रकारची वनस्पती

## ३८. तू माझी माउली

तू माझी माउली मी वो तुझा तान्हा । पाजी प्रेमपान्हा पांडुरंगे ।।
तू माझी माउली मी तुझे वासरू । नको पान्हा चोरू पांडुरंगे ।।
तू माझी हरिणी मी तुझे पाडस । तोडी भवपाश पांडुरंगे ।।
तू माझी पक्षिणी मी तुझे अंडज । चारा घाली मज पांडुरंगे ।।
नामा म्हणे होसी भक्तीचा वल्लभ । मागेपुढे उभा सांभाळिसी ।।



## ३९. भेटीलागी जीवा लागलीसे आस

भेटीलागी जीवा लागलीसे आस । पाहे रात्रंदिवस वाट तुझी ।।
पूर्णिमेचा चंद्र चकोरा जीवन । तैसे माझे मन वाट पाहे ।।
दिवाळीच्या मूळा लेकी आसावली । पाहातसे वाडुली पंढरीची ।।
भुकेलिया बाळ अति शोक करी । वाट पाहे परी माऊलीची ।।
तुका म्हणे मज लागलीसे भूक । धावुनी श्रीमुख दावी देवा ।।

